# चला लढाईवर

[ तीन अंकी नाटक ]

: लेखक :

भा. वि. वरेरकर

: प्रकाशक :

नवभारत प्रकाशनसंस्था मुंबई, ४.

# अंक पहिला

[ मेजर सर सोमनाथ यांच्या बंगल्यांतील दिवाणखाना—कोणत्याही नाईटच्या वैभवाला शोभण्याजोग्या सामानानें हा दिवाणखाना श्रृंगारलेला आहे—त्या सजवण्यांत वैभवाचें प्रदर्शन जितकें करतां येईल तितकें करण्याची काळजी घेतलेली आहे—पडदा वर जातो तेव्हां सर सोमनाथांची मुलगी चंदा एकटीच हजर आहे—चंदेचें वय [illegible] आंत आहे—[illegible] पोषाख फारसा भडक नाहीं—सर सोमनाथांच्या मिलिटरी [illegible] वाढल्यामुळें तिच्यांत मर्दानी बाणा बराच मुरलेला [illegible] असें दिसून येतें—पडदा वर जातो तेव्हां खालील गीत म्हणत मोजकीं [illegible] तालावर येरझाऱ्या घालीत आहे. ]

चला उठा चला उठा चला उठा रणाकडे ।
स्वतंत्र भारतासि नाहिं आज काहिं सांकडें ॥ धृ. ॥
अथांग आमुची गती अपार आमुची मती ।
अनंत बाहु अस्त्र-शस्त्रयुक्त हे विराजती ।
अगण्य गण्य-मान्य त्या विभूतिही अम्हांकडे ॥ १ ॥
हिमालयाग्रधूसरा विशाल आमुची धरा ।
उगारि लाथ हांसडोनि दे प्रचंड सागरा ।
बिशाद काय कोण पाहि ढुंकुनी अम्हांकडे ॥ २ ॥

[ गीत म्हणत असतांना दुसऱ्या ओळींत तिला पुढील चरण आठवत नाहीं—टेबलावर असलेल्या चोपडींत ती तो चरण पाहते आणि नंतर चौथा चरण संपत असतांना बाहेर मोठ्यानें दरवाज्यावरची घंटा वाजते—तशीच गात रामनाथाला घेऊन आंत येते—रामनाथ हा सर सोमनाथांचा एक

दूरचा नातेवाईक आहे—त्याचें वय तिशीच्या आंत असून त्याचा पोषाख आजच्या कोणत्याही कॉलेजच्या विद्यार्थ्यासारखा आहे. ]

**रामनाथः**—आतां पुरे झालीं हीं तुझीं रणगीतं. अशीं गाणीं गाऊन कांहीं वीरश्री संचारत नाहीं अंगांत. त्यांतून तुम्हां बायकांचीं गाणीं—किती मर्दानी आव आणला तरी बायका त्या बायकाच.

**चंदाः**—आणि किती मर्दानी आव आणला तरी तुम्ही कारकून म्हणजे नामर्द ते नामर्द ! गाणीं गाऊन वीरश्री संचारत नाहीं म्हणे ? मग बॅंड कशाला वाजवतात तो ?—गाणंच ना तें ! आणि त्या पलटणी जाऊं लागल्या म्हणजे सारे गोरे शिपाई आपापल्या परीनं वाटेल त्या सूरांत जीं गाणीं गात असतात तीं काय रडगाणीं असतात ? ऑफिसच्या तुरुंगांत टेबलखुर्चीच्या सांपळ्यांत सांपडलेल्या कारकुनाला मर्दानी गाण्याची काय कदर ?

**रामनाथः**—झालं ? आतां बैस तिथं. सर साहेब केव्हां येणार आहेत ? ( बसतो ) ऐकूं येतंय का मी काय विचारतों तें ?

**चंदाः**—मला नाहीं माहित.

**रामनाथः**—मग कुणाला आहे माहित ?

[ चंदा पूर्वीच्या गाण्यांतील चौथा चरण गात मोजकीं पावलें टाकूं लागते ]

**रामनाथः**—कुठलं आणलं आहेस हें गाणं ?

**चंदाः**—तुमच्या ऑफिसांतलं नव्हे खास.

**रामनाथः**—मग कुठलं ?

**चंदाः**—वाटेल तिथलं. तुम्हांला काय करायचंय त्याच्याशीं ? बाबांना भेटायचं असलं तर ते येईपर्यंत स्वस्थ बसा इथं.

**रामनाथः**—बाईसाहेब कुठं आहेत ?

**चंदाः**—मी कोण आहे असं वाटलं तुम्हाला ? घरच्या प्रत्येक माणसाची हालचाल टिपायला मी कांहीं कुणी टेहळी नाहीं.

**रामनाथः**—मग कोण आहेस तूं ?

**चंदाः**—मेजर सर सोमनाथ यांची मी मुलगी आहें.

**रामनाथः**—तें मला माहित आहे. पण या घरांत तुझा दर्जा काय ?

**चंदाः**—नोकराचा तर खास नव्हे. मी मुलगी आहें हें तुम्हाला माहित आहे—आहे ना ?—मग नोकराला विचारायचे प्रश्न मला कां विचारतां ?

**रामनाथः**—तुझ्याशीं बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं—

**चंदाः**—मग नका बोलूं. मी कांहीं तुम्हांला बोलावणं पाठवलं नव्हतं. माझ्याशीं बोलायचं नसेल तर ओटीवर भैय्याशेजारीं जाऊन बसा. बाबा आले कीं कळेल तिथंच. (पुन्हा पूर्वीचें गाणं म्हणूं लागते)

[ ती गाणें म्हणत असतां कृपा येते—वास्तविक तिला लेडी कृपादेवी असें म्हटलें पाहिजे होतें—पण तसें म्हटलेलें तिला आवडत नाहीं. तिचें वय सव्वीस वर्षांचें आहे. ती सर सोमनाथ यांची दुसरी बायको—वैभव असलें तरी वैभवाला शोभेसा पोषाख करणें तिला आवडत नाहीं—आणि हें तिचें करणें सर सोमनाथ यांना आवडत नाहीं. तिनें नवऱ्याच्या वयाला अनुसरून पोक्त-पणानें वागावें असें सर सोमनाथ यांना वाटत असूनही वागणुकीनें ती अगदींच पोरकट आहे. ती चंदाला सुद्धां भीते—तरुणांच्या तांड्यांत मिरवण्याची तिला हौस आहे—पण तें सर सोमनाथ यांना आवडत नाहीं—घरची मालकीण असून सासूच्या हाताखालीं वागणाऱ्या सुनेप्रमाणें तिचें वर्तन असतें. ]

**कृपाः**—(काकुळतीनें) आतां पुरे कर ना तें गाणं चंदा. (चंदा गाणें चालू ठेवते) ऐकूं आलं का? पाहुणीं माणसं घरीं आलीं आहेत—

**चंदाः**—कोण पाहुणीं माणसं? हा कारकूनच ना?

**कृपाः**—कुणाला म्हणतेस हें? या रामनाथ भाऊजीनां?

**चंदाः**—भाऊजी! रामनाथभाऊजी? कसले भाऊजी! म्हणे बाबांचे चुलत चुलत चुलत चुलत भाऊ! उद्यां तुला मूल झालं तर यांनीं दहा दिवस सोहेर पाळायचा किंवा हे मेले कीं आम्हांला दहा दिवस सुतक यायचं—एवढेच ना हे तुझे भाऊजी? कशाला गोळा करते आहेस हा गोतावळा? बरा बंगला ऐसपैस आहे, ड्रिल करायला वाटेल तेवढी जागा आहे, तिथं हीं नातेवाइकं कशाला आणून भरतेयस?

**कृपाः**—असं पहा चंदा, हें बरं नाहीं. किती झालीस तरी तूं मुलगी—

**चंदाः**—हो—तुझी सावत्र मुलगी. कशाला सांगतेस लोकांना? त्यापेक्षां आपली बहिण म्हणून सांगितलं असतंस तर नसतं का जास्त शोभलं?

**कृपाः**—(रामनाथला) केव्हां आलांत भाऊजी?

**रामनाथः**—ती चंदा म्हणते तेंच खरं आहे. कसले आम्ही भाऊजी? त्यापेक्षां स्नेह्यासोबत्याचं नातंच जास्त चांगलं. सरसाहेब केव्हां येणार आहेत?

कृपाः—मला माहित नाहीं. कधीं माहित असतं का तें मला ? मी असतें घरांत म्हणून तुम्हीं विचारतां. पण मी घरांत असतें याची त्यांना जाणीव कुठं आहे ?

चंदाः—शाबास !—एवढं तुला माहित आहे म्हणायचं !

रामनाथः—मधें बोलूं नकोस चंदा—

चंदाः—कां ? ही घरांत असते हें बाबा हिशेबांत धरीत नसले तरी मी असतें इथं हें कांहीं त्यांना विसरायला व्हायचं नाहीं—

रामनाथः—नि आम्हांला देखील.

चंदाः—हो, नि तुम्हांला देखील. कळलं ना आतां बाबा घरांत नाहींत तें. या आतां नमस्कार.

कृपाः—हें काय चंदे ! घरीं येणाऱ्या पाहुणेमाणसांचा असा का उपमर्द करायचा ?

चंदाः—हे कुठले आणखी उपमर्द ? मर्द मला माहित आहेत, नामर्दही माहीत आहेत, पण हे उपमर्द कुठले ? मर्द म्हणजे पति—तसे उपमर्द म्हणजे उपपति का ?

कृपाः—कांहीं जिभेला हाड तरी !

चंदाः—( जीभ दाखवून ) ही पहा—हाड असतं का कधीं कुणाच्या जिभेला ?

कृपाः—काय होतं काम भाऊजी ? ( रामनाथ बोलण्यासाठीं पुढें सरसावतो तोंच ) साहेबांकडे आहे वाटतं काम ?

चंदाः—त्यांना खुणावलंस तें पाहिलं मी !—

रामनाथः—तुला पाहऱ्यावर ठेवली आहे वाटतं ?

चंदाः—हें कलियुग आहे, द्वापार नव्हे. व्यास-पांडवांचा आधार आतां चालायचा नाहीं या जगांत.

कृपाः—( शक्य तितका रागाचा आव आणून ) चंदे !

चंदाः—वेल् लेडी सोमनाथ, काय झालं एवढं पारा चढायला ? मला काय दिसत नाहीं ? जो येतो तो बाबा नसतांना येतो. कोण म्हणे भाऊजी, तर कोण म्हणे भाऊ ! भाऊजी म्हणा कीं दादा म्हणा, नातीं जोडलीं म्हणून कांहीं काळीज बदलत नाहीं. जो येतो तो तुला विचारतो. खरं पाहिलं तर आतां या लोकांनीं माझी चौकशी केली पाहिजे होती—जरा

माझ्याशीं बोलायचं—माझ्याशीं कानगोष्टी करायच्या—मला फिरायला ये म्हणायचं—सिनेमाला बोलवायचं—

**रामनाथः**—तुझी जीभ फार लांब होऊं लागली चंदा !—

**चंदाः**—खामोष ! राईट् अॅबॉऊट् टर्न, किक् मार्च ! ( रामनाथ उठतो ) किक् मार्च म्हणतें ना ?

**कृपाः**—हें काय चंदा, हा गृहस्थपणा झाला का ? आपल्यासारख्याकडे चार माणसं यायचीं नाहींत तर यायचीं कुणाकडे ?—

**चंदाः**—तुझ्यासारख्याकडे—आपल्यासारख्याकडे कशाला म्हणतेस ? आपण म्हणजे बाबा, मी आणि तूं. बाबांकडे येतात साहेब लोक, तुझ्याकडे येतात तरणीं पोरं, नि माझ्याकडे कुत्रासुद्धां ढुंकून बघत नाहीं. लवायला लचकायला येत नाहीं ना मला ? सुस्कारे सोडले पाहिजेत, वर पाहिलं पाहिजे छताकडे—जीव आणला पाहिजे डोळ्यांत, अन् केव्हां केव्हां डोळेसुद्धां मारले पाहिजेत, तें साधत नाहीं ना मला ?

**कृपाः**—हद्द झाली तुझ्यापुढं. मी आतां जातेंच इथून—

**चंदाः**—अन् हेही जाणार वाटतं तुझ्यामागून कुलुंग्या कुत्र्यासारखे ?

**कृपाः**—हें पहा चंदा, आतां मी रडेन हं !

**चंदाः**—( जवळ जाऊन तिच्या खांद्यावर हात ठेवून ) माझी बाई ती, असं करूं नये लहान मुलांनीं ! रडलं कीं तोंड वाकडं होतं. तें बरं दिसत नाहीं चार चौघांना. आपलं हंसावं—बरं का ?—कांहीं झालं तरी हंसावं—म्हाताऱ्याशीं लग्न झालं तरीसुद्धां हंसावं—

**कृपाः**—( तिचा हात लोटून देऊन ) मी जातेंच कशी—( असें म्हणून जाऊं लागते तोंच सर सोमनाथ येतात )

[ मेजर सर सोमनाथ एक मिलिटरी पेन्शनर आहेत. पहिल्या वर्ल्ड वॉर-मधें मेसापोटेमियांत केलेल्या कामगिरीबद्दल त्यांना 'सर' ही पदवी मिळाली आहे. तशींच पुष्कळशीं डेकोरेशन्स् मिळालीं आहेत. खाकी पोषाखाचा मोह त्यांना केव्हांच सुटत नाहीं. मिशाकल्ले करडेपणांतून शुभ्रपणांत प्रवेश करीत असले तरी त्यांचा फौजी रुबाब यत्किंचितही कमी झालेला नाहीं. ते क्वचित्च हंसतात आणि दुसऱ्यानें हंसलेलें त्यांना आवडत नाहीं. कृपादेवीवर त्यांचें अतोनात प्रेम आहे पण तेंही वाघ–वाघिणीच्या प्रेमासारखें. चंदा मात्र त्यांना

मुलींच भीत नाहीं आणि तेही चंदेला भीत नाहींत. त्यांचें वय पन्नास आणि साठ याच्या दरम्यान कुठेंतरी आहे. ते येतांच जात असलेली कृपा मागें हटते.]

**चंदाः**—अॅटेन्शन् ! स्यॅलूट !

**सर सोमनाथः**—चंदा !

**चंदाः**—जी सर सोमनाथ—जी मेजर सर सोमनाथ.

**सर सोमनाथः**—चंदा, हें काय चाललं आहे ?

**चंदाः**—काय चाललं आहे नव्हे—चालली आहे. ही तुमची बायको घरांत चालली आहे.

**सर सोम०ः**—चंदा, आदब !—आदब राख. मी बाप आहे तुझा—

**चंदाः**—होय बाबा—

**सर सोम०ः**—म्हणूनच म्हणतों आदब राख.

**चंदाः**—हो. आदब राखायची मेजर सर सोमनाथ यांची—अन् बापाच्या ( त्याच्या मिशा धरून ) अशा या मिशा—

**सर सोम०ः**—चंदा तूं आतां लहान नाहींस. लहानपणीं तें शोभत होतं. आवडत होतं देखील मला. मोठा अभिमान आहे मला माझ्या मिशांचा. फौजेंत या मिशांच्या रुबाबावरच मी मारून नेत होतों, पण घरीं आलों, कीं तूं त्या मिशांची वाट लावीत होतीस. किती पोमेड खर्च झालं आहे या मिशांपायीं--अन् तें केवळ तुझ्यामुळं—( रामनाथला ) केव्हां आलास रामनाथ ? अन् तो खंडेराव नाहीं आला अजून ?

**चंदाः**—कुणीच नाहीं आलेत अजून. तुम्ही यायची वेळ आहे ना ही ! यावेळीं कसे कोण येतील ?

**सर सोम०ः**—( बसत ) अस्सं ! एकूण ब्रह्मदेश गेला अं ! अशावेळीं वाटतं,—

**चंदाः**—कांहीं नाहीं वाटत. आतांच्या लढाया म्हाताऱ्यांसाठीं नाहींत. ते लॉर्ड रॉबर्टसूचे दिवस गेले आतां. आतांचे जनरल्स् बघा, कसे तरणेबांड आहेत—

**सर सोम०ः**—म्हणूनच हें असं होतंय. म्हाताऱ्यांची कदर नाहीं कुणाला. कुणीच ऐकत नाहीं यांचं—

**चंदाः**—बायको मुलं सुद्धां.

**सर सोम०:**—हो, बायको मुलं सुद्धां. ( कृपेला ) ये बैस ना इथं. स्वतःची योग्यता स्वतः राखून घेतली पाहिजे. माझ्याकडे पहा—माझ्यावर नजर ठेव—

**चंदाः**—( त्याच्या मिशावरून हात फिरवून ) या ध्यानीं घे—

**सर सोम०:**—( मिशावर ताव देत ) हो, या ध्यानीं घे म्हणजे कसं वागावं हें तुला आपोआप कळेल. तुझं चुकतं तें इथंच, वय विसरलं पाहिजे. तूं हिची आई आहेस हें केव्हांही विसरूं नकोस—

**चंदाः**—अन् यांची बायको आहेस—लेडी सोमनाथ आहेस—कुठली तरी मिस् कृपा नव्हे—

**सर सोम०:**—हो, मिस् कृपा नव्हेस—मिसेस् कुणीतरीही नव्हेस—लेडी सोमनाथ आहेस हें ध्यानांत ठेव. ( रामनाथ बसला असें पाहून ) कुणासमोर बसलास रामनाथ ? उभा राहा. आदबीनं उभा राहा—

**चंदाः**—ॲटेन्शन् !

**कृपाः**—जाऊं का मी ?

**सर सोम०:**—कुणीकडे ? नुक्ता मी आलों अन् ही निघाली ! ही आदब नव्हे. तूंच शिस्त मोडूं लागलीस तर हीं परकीं माणसं शिस्तींत कशीं वागणार ?

**कृपाः**—रामनाथ भाऊजी कांहीं परकी नाहींत आपल्याला.

**सर सोम०:**—जे या घरांत राहत नाहींत ते सारे परकी आहेत.

**चंदाः**—नि जे या घरांत राहत नाहींत पण सारा दिवस याच घरांत काम करतात त्यांना परकी म्हणायचं कीं आपले म्हणायचं ?

**सर सोम०:**—उदाहरणार्थ ?

**चंदाः**—खंडेराव.

**सर सोम०:**—मोठा प्रश्न आहे हा. मोठा बिकट प्रश्न काढलास खरा—

**रामनाथः**—( आदबीनें पुढें येऊन ) मी अशासाठीं आलों होतों—

**चंदाः**—सांगा ना. खंडेराव आपले कीं परके ?

**सर सोम०:**—आपले कीं परके ? दोन्हीं नाहींत. ते नोकर आहेत. नोकर नोकरीला आहे तोंपर्यंत आपला, नाहीं तर परका.

**चंदाः**—म्हणजे ते आपलेच—परके नव्हेत. ( कृपा हंसते ) हंसतेस काय—हें आतां निश्चित झालं, खंडेराव परके नाहींत. हे तुझे रामनाथभाऊजी मात्र परके.

**रामनाथ**:—तेव्हां मी असं म्हणत होतों, कीं मला एक नोट पाहिजे आहे—

**चंदा**:—किती रुपयांची ?

**रामनाथ**:—मला नोट पाहिजे आमच्या साहेबांना—

**सर सोम०**:—हं हं समजलों. तुला नोट पाहिजे आहे—म्हणजे प्रमोशन पाहिजे आहे किं बदली पाहिजे आहे ? जायचं आहे बाहेर मुंबईतून ?

**रामनाथ**:—छे छे, मुळींच नाहीं. आपलं छत्र सोडून बाहेर जाऊन काय करणार मी ? तेव्हां मी म्हणतों—

**सर सोम०**:—कांहीं म्हणूं नकोस. उद्यां ये सवडीनं. घाई नाहीं ना ? ठीक—ठीक—उद्यां ये—पहातोस काय—उद्यां ये म्हटलं ना !

**रामनाथ०**:—जी. मग उद्यां येऊं तर ?

**चंदा**:—हो हो उद्यां या. कळलं आतां—जा. ( रामनाथ जातो ) कांहीं तरी कारण काढून उगीच घिरट्या घालीत असतात हे लोक इथं.

**सर सोम०**:—अग ते यायचेच. माझ्या शब्दाला मान आहे, चार साहेब लोक मी सांगितलं तर ऐकतात म्हणून कुणीतरी येतात.

**चंदा**:—पण सारे मेले कारकून. लढाईवर जातों म्हणून सांगायला येतोय का कुणी ? एवढं कसं कळत नाहीं यांना कीं तुम्हीं मेजर साहेब आहांत—आज लढाई सुरू झाली आहे—तिकडे माणसांची जरुरी आहे—इथं प्रमोशन मागत बसण्यापेक्षां लढाईवर गेलं तर काय होतं याचं प्रत्यक्ष उदाहरण दिसतंय, तरी साहेबाला चिठ्ठी मागताहेत—अन् तीही नुसती प्रमोशनसाठीं—

**सर सोम०**:—खरं आहे तुझं म्हणणं—

**कृपा**:—जाऊं आतां मी ?

**चंदा**:—कां ? कंटाळलीस आमच्या बोलण्याला ?

**कृपा**:—तसं नव्हे—म्हटलं हीं असलीं बोलणीं चाललीं आहेत, मला त्यांत कांहीं कळत नाहीं, तेव्हां म्हटलं उगीच भिंतीवजा बसून राहण्यापेक्षां—

**चंदा**:—काय करणार आहेस जाऊन ? घरांत गडी आहेत, सैंपाकी आहेत, शिपाईप्यादे आहेत. तुला काय आहे काम ?

**कृपा**:—म्हटलं कांहीं वाचीत बसेन.

**चंदा**:—काय वाचणार आहेस ? कादंबऱ्याच ना ? एवढीं फौजी पुस्तकं पडलीं आहेत, नवीं नवीं येताहेत, पण एकाला हात लावशील तर शपथ.

कृपाः—तूं वाचतेस ना तीं ?

चंदाः—म्हणून काय तूं वाचूं नयेस ? हें आमचं फौजी घराणं आहे. सध्यां लढाई चालू आहे. यावेळीं दुसऱ्या कसल्या गोष्टी बोललेल्या या घरांत बऱ्या दिसत नाहींत.

सर सोम०:—ऐक. या पोरीला कळतं. कां कळतं ? ती माझी मुलगी आहे. बराकींतलं अन्न तिच्या पोटांत गेलं आहे. रांगत होती तेव्हापासून पिस्तुलाशीं खेळते आहे. तें जें कांहीं आहे तें रक्तांत पाहिजे माणसाच्या. म्हणून ना आमचं सरकार लढाऊ जातींना अग्रमान देतं ?—

चंदाः—तुमचे वडील फौजेंत होते का बाबा ?

सर सोम०:—( हंसून ) छे ग, ग्रामजोशी होते ते. ( कृपा हंसते ) हसू नकोस. ते ग्रामजोशी होते खरे पण त्यांचे वडील वारणेच्या लढाईत कामास आले होते. आमचे चुलते खरड्याच्या लढाईत पडले—

चंदाः—ऐकलंस ?

कृपाः—( मोठ्या मिनतवारीनें ) अन् चंदेच्या आईचे वडील ?

सर सोम०:—ते असतील कुणीतरी. बीज लढवय्याचं पाहिजे—क्षेत्र कुठलंही असलं तरी चालेल—

कृपाः—आतां माझा जीव खालीं पडला.

सर सोम०:—म्हणून मी हा मुहूर्त पाहिला—म्हणूनच मी तशी जाहिरात दिली. ज्या दिवशीं लढाईवर मला पहिली गोळी लागली—अगदीं या छातीजवळ बरं चंदा—मरायचाच त्या वेळीं मी—पण हें रक्त लढवय्याचं होतं—लढवय्या बरगडींत घुसलेली गोळी ती—ती काय जीव घेते ? म्हणूनच मी तशी जाहिरात दिली—त्या दिवशीं मी मेलेला जगलों—त्याच दिवशीं जिचा जन्म झाला असेल तीच माझी बायको व्हायला पाहिजे असं मला वाटलं. तशी तूं मिळालीस—

चंदाः—छातींतली एक गोळी निघाली अन् ही दुसरी येऊन बसली—छातींत नव्हे—

सर सोम०:—गप्प बैस. हे योगायोग आहेत. या फौजी योगायोगांचं इंगित तुला कळायचं नाहीं. कांहीं नकोत तीं पुस्तकं वाचायला. नुसतं माझं भाषण ऐकत राहशील तरी सुद्धां वीरश्री संचारेल रोमरोमांतून.

चंद्राः—मग तुम्हीं कशाला वाचतां तीं पुस्तकं ?

सर सोम०ः—तुमच्यासाठीं. ती आठवण जागी राहिली पाहिजे ना ! वाचित राहिलं पाहिजे, नाहींतर माणूस मागं पडतो. आज काय होतंय तें कळत नाहीं. तें कळलं पाहिजे, म्हणून वाचावं लागतं एवढं. इथं घरांत बसून सारं रणांगण माझ्या नजरेसमोर उभं राहतं. संधि नाहीं चंदा, संधि नाहीं. संधि आली असती—नव्हे दिली असती—म्हणजे दाखवली असती तुम्हांला माझी कर्तबगारी ! त्या संधीची वाट पाहतोंय मी. माझी खात्री आहे, आज ना उद्यां आम्हांला हाक घालावी लागणार. तें चुकायचं नाहीं. हीं कामं आमचीं आहेत. काय सांगूं तुला पोरी—

चंद्राः—कांहीं सांगूं नका. पुष्कळ वाचतें आहें, पुष्कळ ऐकतें आहें अन् मला देखील वाटतं आहे, कीं कांहींतरी अजब करून दाखवावं ! तिकडे म्हणे बायका लढताहेत—इकडे सुद्धां बायका लढाईच्या कामाला लागल्या आहेत ! हंः ! कपबशा विसळताहेत कॅंटिनमधें. यांना वाटतं आम्हां बायकांना लढतां यायचं नाहीं—

कृपाः—आतां राणी दुर्गावती, अहिल्याबाई होळकर आणि झांशीवाली लक्ष्मीबाई, सावित्री ठाणेदारीण यांच्या गोष्टी सांगणार आहेस वाटतं ?

चंद्राः—त्यांच्या गोष्टी कशाला ? त्या गेल्या, मेल्या, नापत्ता झाल्या. आजच्या बायका पाहा—इथल्या लवत्या लचकत्या मुरळया नव्हेत—रशियांतल्या बायका पहा—चीनच्या बायका पहा—

कृपाः—कुठून पाहूं ? कधीं गेलें होतें मी रशियाला ? कधीं पाहिलं होतं मी चीन ? कुणी पाठवलं होतं मला तिकडे ? मागं चीनला तें ॲम्ब्युलन्स पाठवलं होतं, त्यावेळीं मी जातें म्हटलं, पण त्या वेळीं मला पाठवणं झालं नाहीं—

सर सोम०ः—तें प्रकरण खाजगी होतं—सरकारी नव्हतं—

कृपाः—खाजगी काय, सरकारी काय, पण चीनला बायका कशा लढतात हें तरी पाहून आलें असतें.

सर सोम०ः—चुकलं खरं ! आतां वाटतंय हो असं !—आजची परिस्थिति त्या वेळीं असती तर तुला पाठवायला मला कांहींच वाटलं नसतं.

कृपाः—आतां कांहीं कुणी जात नाहीं नि कुणी मला पाठवीतही नाहीं.

चंद्राः—नर्स म्हणून जा की.

कृपाः—कुठं ? इथल्याइथं ? इथं कुठं आहे लढाई ? काय पाहायला मिळणार इथं ?

चंदाः—मिळेल, मिळेल—इथंही पाहायला मिळेल. पण तेव्हां मात्र लपून बसशील त्या नव्या बांधलेल्या तळघरांत. फौजी माणसाच्या घराला कशाला हवींत हीं तळघरं ? भेकडांनीं बांधावींत तीं—भेकडांच्या तजविजी चालल्या आहेत साऱ्या. लढाईची तयारी करा ना म्हणावं, मग आम्हीं मागं आलों तर विचारा.

सर सोम०ः—तुम्हीं कोण ?

चंदाः—आम्ही—बायका, पुरुष, मुलं, एकजात हिंदुस्थानचे सारे लोक. पण पहिल्यापासून ही खड्डे खणायची तयारी चालली आहे ! घाबरताहेत लोक. इकडे लढाईवर चला म्हणायचं अन् इकडे तळघरं बांधित सुटायचं ! असं चाललंय का तिकडे ?

सर सोम०ः—दोन्ही पाहिजेत पोरी, दोन्ही पाहिजेत. सारेच कांहीं लढवय्ये नसतात. तळहातावर शिर घेऊन रणांगणावर बेफाम घुसणारा वीर जसा पाहिजे, तसा इकडे गांव राखण्यासाठीं सावकार दुकानदारही पाहिजे. भित्रे असतात ते हे सावकार दुकानदार. त्यांच्यासाठीं हे खड्डे खणताहेत.—खरंच, खंडेराव नाहीं आला अजून ?

चंदाः—कां ? त्यांचीशी आठवण झाली यावेळीं ?

सर सोम०ः—मी नुसतं सावकार दुकानदार म्हटलं, पण कारकुनांना विसरलों होतों. कारकुन आठवले आणि खंडेराव आठवला. सावकार-दुकानदारासारखीच ही कारकुनांची बोरूबहाद्दर भेकड पलटण आहे ना ?—त्यांच्यासाठींच हे खड्डे—त्यांच्यासाठींच ते ए. आर. पी—निदान तेवढ्या-साठीं तरी बाहेर येतील घरांतून म्हणून केली आहे ती योजना. ( खंडेराव येतो ) आलास ? घड्याळाकडे पाहिलंस ?

[ खंडेराव हा सर साहेबांचा एक तरुण कारकून आहे. शरीरानें सुदृढ असला तरी मनानें तो अगदींच दुबळा आहे. सरसाहेबांसमोर तो थरकांप भीतो—कृपादेवीची एकटीच गांठ भेट झाली तरच त्याची जीभ सैल सुटते—इतर सर्वांना तो शक्य तितका टाळीत असतो—]

खंडेरावः—माझं घड्याळ हरवलं.

**सर सोम०**:—कसं हरवलं ? ( चंदा मोठ्यानें हंसते ) हसूं नकोस चंदा. आज स्वतःचं घड्याळ हरवलं—उद्यां माझे महत्त्वाचे कागद हरवून टाकील.

**खंडेराव**:—कागद इथंच राहतात, घड्याळ माझ्या खिशांत असे—

**सर सोम०**:—हातांतलं घड्याळ कां नाहीं घेतलंस ?

**खंडेराव**:—तसं होतं एक पूर्वी—पण तें पट्टा तुटून ट्राममधें हरवलं.

**सर सोम०**:—किती घड्याळं हरवलीं अशीं ?

**खंडेराव**:—सहासात हरवलीं—

**सर सोम०**:—आतां यापुढं घड्याळ घेऊं नकोस विकत.

**खंडेराव**:—मग वेळीं कसं यायचं ?

**चंदा**:—राजाबाई टॉवरचं घड्याळ बघा. नाहींतर वाटेंत आहेच कीं एन् पॉवेलचं.

**खंडेराव**:—पण घरीं ?

**चंदा**:—तुमच्या खाणावळींत नाहीं वाटतं घड्याळ ?

**खंडेराव**:—हो हो, तिथं आहे घड्याळ. मी अगदींच विसरलों होतों. अन् चहाच्या दुकानांतही घड्याळं असतात—

**सर सोम०**:—सारीं पत्रं झालीं तयार ?

**खंडेराव**:—हो, आंत लायब्ररींतल्या टेबलावर सहीसाठीं ठेवलीं आहेत. सह्या झाल्या नाहींत वाटतं ?

**सर सोम०**:—कशा होणार सह्या ? मला सांगितलंच नाहीं कुणीं.

**खंडेराव**:—मी बाईसाहेबांना सांगितलं होतं जातांना.

**कृपा**:—खरंच मी विसरलें.

**सर सोम०**—विसरलें म्हणे ! आतां आजच्या डाकेला कांहीं तीं पत्रं जात नाहींत ! अलीकडे आधीं पत्रंच पोंहचत नाहींत वेळेवर. त्यांतून ही अशी दिरंगाई. आहेत ना तीं तिथं—( बोलत बोलत आंत निघून जातो )

**खंडेराव**:—सुटलों !

**चंदा**:—काय म्हटलंत ?

**खंडेराव**:—काय म्हणणार ? पाणी झालं होतं माझ्या काळजाचं.

**चंदा**:—वा रे जवान मर्द !

खंडेराव:—एकदां कारकुनी करून पहा—नि असा फौजी धनी मिळूं दे—म्हणजे कळेल मर्दाची मर्दाई.

चंदा:—धनी नसला तरी बाप तर आहे—

खंडेराव:—बाप म्हणजे कांहीं धनी नव्हे. अन् कारकून म्हणजे कांहीं लाडकी मुलगी नव्हे. कारकुन झाल्याशिवाय कारकुनाचीं दु:खं कळायचीं नाहींत. कारकुनाचं जीवन म्हणजे—

चंदा:—हं हं थांबा. कारकुनांच्या जीवनावरचं व्याख्यान नको आहे मला. मला कांहीं कारकुन व्हायचं नाहीं—

कृपा:—मुलीच्या जन्माला आल्याचं एवढंच भाग्य आहे म्हणायचं.

[ आंतून सर साहेब ' चंदा, चंदा ' म्हणून हांक मारतात—' आलें हं ' म्हणून चंदा निघून जाते. खंडेराव टेबलाजवळ बसून वरचे कागद उगीच चाळूं लागतो—कांहीं अंतरावर उभी राहून कृपा त्याच्याकडे पाहत असते. ]

कृपा:—हें काय झालंय तुम्हांला अलीकडे ?

खंडेराव:—( तिच्याकडे न पाहतां ) काय झालंय तें दिसतंच आहे तुला—नव्हे नव्हे—दिसतंच आहे तुम्हांला बाईसाहेब.

कृपा:—ती पुरे झाली बाईसाहेबी. वीट आला आहे या मोठेपणाचा. तुम्ही तरी असं हिणवायला नको होतं मला.

खंडेराव:—( तसंच न पाहतां ) आतां नोकर झालोंच आहें तुमचा, बाईसाहेबी विसरून कसं चालेल मला ?

कृपा:—काय झालंय हें तुम्हांला ? कॉलेजांत असतानां एक ' स्पोर्ट ' म्हणून तुम्हीं गाजलां होतां, वक्ते म्हणून नांव कमावलं होतं, सारे दिपून जात होते तुमच्यापुढं, नि आतां हे असे अगदींच माऊ होऊन कसे गेलांत ? ( खंडेराव नुसता ' हं: ' असा उद्गार काढतो ) माणसाच्या आयुष्यांत दु:खं संकटं हीं यायचींच—त्यांच्यापुढं असं चुरडून जाऊन कसं चालेल ? ( खंडेराव टेबलावरील कागद लोटून एकदम येऊन कृपेपुढें उभा राहतो—क्षणभर तिच्या डोळ्याला डोळा देऊन पाहत राहतो—ती घाबरून एक पाऊल मागें सरते ) काय झालं ?

खंडेराव:—काय झालं ! काय झालंय तें तुला माहित नाहीं ? लहानपणा-पासून आपण एकाजागीं वाढलों—तेव्हांपासून आपल्या आईबापांनीं नवरा-

बायको म्हणावं आम्हांला—बाळपणच्या त्या खुळया चाळयांत कितीतरी वेळ आपण लग्न लावून घेतलीं, माळा घातल्या एकमेकांना, आणाभाका घेतल्या—जरा मोठेपण येतांच—हं: ! पुढं खरींच मोठीं झालों. नवराबायको म्हणजे काय तें कळूं लागलं. त्याहीपेक्षां आणखी ज्ञान आलं—प्रेम म्हणजे कांहींतरी आहे याची जाणीव झाली. तात्कालिक प्रेमापेक्षां बालपणापासूनच्या सहवासाचं प्रेम अगदींच वेगळं असतं—तसल्या त्या प्रेमाची जाणीव झाली. कॉलेजांत असतांना एकमेकांच्या हातांत हात घालून कितीतरी उलाढाली केल्या. बरोबरच्या सोबत्यांनीं थट्टा केली तरी तिचं आपल्याला कौतुक वाटत होतं—होय ना ? ( क्षणभर स्तब्धता ) अन् ही जाहिरात आली. त्यावेळीं तुझे अन् माझे आईबाप तरी हयात असते ! वचनं आमचीं होतीं तशीं त्यांचींही होतीं—नव्हे त्यांचीं वचनं आधींचीं होतीं. त्यांना त्या वचनाची पर्वा होती. तूं विसरलीस—त्या आणाभाका विसरलीस !—उघडया डोळयानं कसं या म्हाताऱ्याशीं लग्न केलंस ? बोल ना. आतां कां उगी राहिलीस ?
( कृपा मट्कन् खालीं बसते—खंडेराव जाऊन टेबलावरचे कागद पुन्हां चाळूं लागतो—कृपा उठून हळुहळू त्याच्या खुर्चीच्या मागें उभी राहते. ती मागें उभी राहिल्याची त्याला जाणीव होते पण तो ती दिसूं 'देत नाहीं )

**कृपा**:—चूक झाली ती माझी—ऐकलं ?—ती माझी चूक झाली. आतां असं वाटतंय—त्या वेळीं तसं वाटलं नव्हतं. कांहींतरी वेड आलं माझ्या डोक्यांत—( क्षणभर उगीच राहते ) ऐकूं येतंय ना ?

**खंडेराव**:—नाहीं. कारकुनाच्या कानांना सारंच कांहीं ऐकूं येत नाहीं. ( जरा कलतें पाहून ) आतां आपण तिकडे दूर बसाल का बाईसाहेब ?

**कृपा**:—( दांतओंठ खाऊन ) बाईसाहेब ! कां हिणवतां मला ? पुन्हां पुन्हां कां हिणवतां मला ? कां अशा दुःखावर डागण्या देतां ?

**खंडेराव**:—( तिच्याकडे न पाहतां ) कसलं आलंय दुःख तुला ? चांगलं भरलेलं घर आहे, नोकरचाकर, दासदासी ! केवढा इतमाम आहे तुझा ! गव्हर्नर व्हाईसरॉय यांची भेट होते तुझ्याशीं ! असलं वैभव पाहिलं तर बडया लक्षाधीशांच्या तोंडालासुद्धां पाणी सुटेल. सुखाची एवढी भरताड झाली तर अशी एकाद दुसरी सुई बोचली म्हणून काय झालं ? पराच्या गाद्यांवर लोळतांना एकादी टांचणी खुपली म्हणून कांहीं माणूस मरत नाहीं—

[ बाहेरून पुष्पा ' चंदा चंदा ' म्हणून हांक मारते—पुष्पा ही कृपेच्या नातेवाईकांपैकीं एक मुलगी आहे—कृपेचें लग्न झाल्यावेळीं ती जी तिच्या· बरोबर आली ती तिथेंच राहिली—पुन्हां आपल्या घरीं गेली नाहीं. सरसाहेबांच्या घरांत ती चंदेइतकाच अधिकार गाजवण्याचा प्रयत्न करीत असते. चंदेपेक्षां ती चारदोन वर्षांनीं मोठी असेल पण डामडौल आणि थाटमाट करण्यांत ती त्या दोघींच्या साधेपणाची उणीव पुरेपूर भरून काढीत असते. पुष्पाचा आवाज ऐकतांच कृपा कावरीबावरी होऊन एकदम दुसऱ्या टोंकाला जाते आणि टेबलावरचें एक पुस्तक घेऊन तें उघडून त्यांतील गाणें म्हणूं लागते. कृपा गात असतांना पुष्पा प्रवेश करते आणि संशयी मुद्रेनें त्या दोघांकडे कांहींवेळ पाहत राहते. ती गात असतांनाच दाराशीं जाऊन ' चंदा चंदा ' म्हणून हांक मारते. एकदां बाहेर जाऊन पुन्हां आंत येते-त्याचवेळीं कृपेचें गाणें संपतें. ]

**पुष्पाः**—किती गोड आहे ग तुझा गळा ? मोठा मत्सर वाटतो तुझा मला. या गाण्यानंच भुरळ घातलीस वाटतं सर साहेबांना ? ( कृपा अस्वस्थपणें एका कोचावर बसते. खंडेराव टेबलावरील कागद वाचीत आहे ) पुन्हां म्हण ना तें पद. यांना ऐकवीत होतीस वाटतं. ( उठून खंडेरावाकडे जाऊन ) ताईचा गळा छान आहे—नाहीं ?

**खंडेरावः**—( दचकून ) काय म्हटलंस ?

**पुष्पाः**—म्हटलं, कृपाताईचा गळा मोठा गोड आहे नाहीं ?

**खंडेरावः**—मला गाण्यांत कांहीं कळत नाहीं.

**पुष्पाः**—मग काय कळतं तुम्हांला ?

**खंडेरावः**—हें माझं काम. या माझ्या कामापलिकडे मला कांहीं कळत नाहीं अन् कांहीं कळायलाही नको आहे.

**पुष्पाः**—मग तुम्हीं नाहीं सांगितलं वाटतं हिला गाणं म्हणायला ?

**खंडेरावः**—मी ! पुष्पाताई तुम्हीं विसरतां मी नोकर आहें या बाईसाहेबांचा.

**कृपाः**—नाहीं. तुम्हीं त्यांचे सेक्रेटरी आहांत—नोकर नव्हे.

**खंडेरावः**—त्या व्याख्या मला कळत नाहींत. मी इथं येतों तो नोकर म्हणून, काम करतों तें नोकर म्हणून. सरसाहेबांचा मी नोकर अर्थात् लेडी सोमनाथही माझ्या मालकच आहेत असं मी समजतों.

कृपाः—तुम्हीं समजत असाल पण मी नाहीं तसं समजत.

पुष्पाः—गाऊन दाखवीत होतीस कुणाला ?

कृपाः—मी आपली माझ्याशींच गात होतें—स्वतःच्या जिवाची करमणूक करायला. ( एकदम ) चंदा कुठं गेली ही ?

पुष्पाः—तेंच विचारतेंय मी. आज सिनेमाला जायचं ठरलं होतं आमचं पण आतां आली तर आज कांहीं जाणं होत नाहीं. आणि म्हणे मिलिटरी शिस्त ! कधीं कुठलं काम वेळेवर करील तर शपथ.

कृपाः—मग जा तिला शोधून काढ ना. ( पुष्पा एकदां खंडेरावाकडे आणि एकदां कृपेकडे पाहते ) आत्तांच इथं होती ती. त्यांनीं बोलावलं वाटतं तिला.

पुष्पाः—होय ना ? झालं तर. आतां ती कांहीं येत नाहीं अन् सिनेमाला जाणंही होत नाहीं. तूं येतेस ?

कृपाः—मी ? हंः, मला नाहीं सिनेमा आवडत. निर्जीव चित्रांच्या हालचाली बघण्यापेक्षां चालते बोलते पुतळेच पाहणं मला आवडतं फार. निर्जीव चित्रं हालचाल करूं लागलीं आहेत पण चालतीं बोलतीं माणसं कशीं निर्जीव होताहेत याचंच आश्चर्य वाटतंय मला ! अशा निर्जीव माणसांत जीव कसा घालावा याचाच विचार करीत होतें मी. विचार करतां करतां ही कविता आठवली—पुस्तक घेतलं अन् म्हणूं लागलें—( एकदम उठून दचकून खंडेरावाकडे पाहते आणि निघून जाते ).

पुष्पाः—काय झालं हिला ? ( खंडेरावाजवळ जाऊन ) कुणाला उद्देशून बोलत होती ही ? कोण हीं निर्जीव माणसं ?

खंडेरावः—मी कांहीं मनकवडा नाहीं. श्रीमंत माणसं लहरी असतात. उद्योग नसतो कांहीं—कलाकौशल्य, काव्य, गायन, नृत्य असलीं कांहींतरी ढोंगं घेऊन नाचत राहण्याखेरीज काय काम असतं त्यांना ? त्यांतलंच असेल कांहीं तरी.

पुष्पाः—नाहीं. तुम्हांला माहित आहे—मुद्दामच तुम्हीं सांगत नाहीं मला. सारखी तुमच्याकडे पहात होती तें तसं बोलतांना. ( एक खुर्ची ओढून घेऊन त्याच्याजवळ बसते ) तुम्हांलाच उद्देशून म्हणत होती ती. तसं पाहिलं तर मलासुद्धां पटतं तें. अगदींच निर्जीव दिसतां तुम्हीं. ( खंडेराव हंसतो ) पण असं हंसलात कीं तुमच्यांत कांहीं जीव आलासा वाटतो—तुमचं लग्न झालं आहे का हो खंडेराव ?

**खंडेराव**:—( हंसून ) लग्न झालेल्या माणसासारखा दिसतों का मी ?

**पुष्पा**:—हें तुमचं कांहींतरीच. माणसाचं लग्न झालं आहे कीं नाहीं हें कुणाचं नुसतं तोंड पाहून कसं कळावं ? स्त्री असली तर सांगतां येईल—हिंदु स्त्री हो !—मंगळसूत्र असतं ना तिच्या गळ्यांत, पण तें देखिल हल्लीं घालीत नाहींत कुणीकुणीं. घातलंच तर गळ्याबरोबर नसतं. साहेबांच्या बायकांच्या बोटांत आंगठी असते त्यावरून अगदीं सहज कळतं. ( आपल्या बोटाकडे पाहून ) तसं कांहींतरी केलं पाहिजे आपल्याकडे. मी बोलतें तें ऐकूं येतंय का तुम्हांला ?

**खंडेराव**:—नाहीं. कामांत असलों कीं मला कुणाचंच बोलणं ऐकूं येत नाहीं.

**पुष्पा**:—माझ्या बोलण्यानं व्यत्यय येत नाहीं ना तुमच्या कामांत ?

**खंडेराव**:—छे छे ! रस्त्यांतून सतरा टॅक्स् गेलीं तरीसुद्धां माझं मन कामावर ठेवतां येतं मला. चालूं द्या तुमचं बोलणं. माझ्या खोलींत चिलटं भुणभुणतात कानाजवळ तरीदेखिल मी वाचींत बसतों. हं, चालूं द्या.

**पुष्पा**:—तेव्हां काय म्हणत होतें मी—

**खंडेराव**:—हातांत आंगठी हवी.

**पुष्पा**:—वा: ! म्हणजे तुम्हीं ऐकत होतां तर ?

**खंडेराव**:—नाहीं. शब्द निसटून जात होते कानांवरून, त्यांतला एकादा कुठंतरी अडकून रहात होता कानांत.

**पुष्पा**:—छे. गेलंच तें. मधें विक्षेप झाला कीं मग मागलं कांहींच सुचत नाहीं मला—( क्षणभर स्तब्धता ) कुठं गेली ही चंदा ? आज माझा सिनेमा बुडवला तिनं. तुम्हीं जातां का सिनेमाला कधीं ?

**खंडेराव**:—हो, रोज जातों, पण एकटाच जातों—

**पुष्पा**:—ताई म्हणाली तें कांहीं खोटं नाहीं—अगदींच निर्जीव आहांत तुम्हीं.

**खंडेराव**:—बायकांच्या बरोबर तर कधींच जात नाहीं सिनेमाला मी.

**पुष्पा**:—कां ?

**खंडेराव**:—मला तिटकारा आहे बायकांच्या जातीचा. मोठ्या खट्याळ असतात त्या—अन् नाठाळही असतात. एकदांच गेलों होतों असा कॉलेजांत असतांना एकीबरोबर. तिनं सुखानं कांहीं पाहूं दिलं नाहीं मला. तसं कांहीं दिसलं कीं सारख्या कोपरखळ्या मारीत असे—

पुष्पा:—तसं कांहीं म्हणजे ?

खंडेराव:—इंग्रजी फिल्मस् पहात नाहीं वाटतं तुम्ही ?

पुष्पा:—असं होय ? ( हंसते ) मी सुद्धां कोपरखळी मारली असती तुम्हीं बरोबर असतां तर—तसं कांहीं दिसलं असतं तेव्हां.

खंडेराव:—( एकदम उठून ) साहेब हांक मारताहेत वाटतं ?

पुष्पा:—नाहीं. तो फेरीवाला ओरडतोय खालीं.

खंडेराव:—( खिडकीकडे जाऊन डोकावून पाहून ) अरेच्या ! तो हा हांक मारतोय वाटतं मला—( असें म्हणून घाईघाईनें निघून जातो )

[ पुष्पा आपल्याशींच हंसत इकडे तिकडे फिरून खिडकींतून डोकावून पहाते. तोंच कृपा येते ]

कृपा:—गेले वाटतं ?

पुष्पा:—( दचकून मागें वळून ) तूं का ?—ते होय—त्यांना कुणी हांक मारली वाटतं—निदान तसं म्हणून ते गेले खरे.

कृपा:—तूं काय बोललीस त्यांना ?

पुष्पा:—मी ? मी काय बोलणार त्यांना ? कांहीं बोलण्याची सोय आहे का त्यांच्याजवळ ? अगदींच भित्रट आहे माणूस हा.

कृपा:—उगीच कशाला केलास त्यांच्या कामांत व्यत्यय ?

पुष्पा:—अन् तूं गात होतीस तेव्हां नव्हता वाटतं होत व्यत्यय ?

कृपा:—मी कांहीं बोलत नव्हतें त्यांच्याशीं

पुष्पा:—मग त्यानीं मला सांगायचं होतं तसं.

कृपा:—हें पहा पुष्पा, तूं माझ्याबरोबर आलीस, इथं राहिलीस—कां राहिलीस म्हणून कुणी विचारलं नाहीं तुला—कुणाच्या ना कुणाच्या तरी नात्यागोत्याचीं माणसं इथं गोळा होताहेत, तशी तूंही इथं राहिलीस. पण त्याची जबाबदारी माझ्यावर आहे एवढं ध्यानांत ठेव म्हणजे झालं. ( चंदा येते ) आलीस ! ही पुष्पा केव्हांची तुझी वाट पहातेय.

चंदा:—तें होतं माझ्या ध्यानांत. पण बाबांकडे एक पाहुणे आले आहेत. मोठे महत्त्वाचे पाहुणे आहेत हे—

पुष्पा:—कोण आले आहेत ?

चंदा:—फारच महत्त्वाचे पाहुणे आहेत. ब्रह्मदेशच्या लढाईवरून आले आहेत—

पुष्पाः—काय म्हणतेस! ब्रह्मदेशच्या लढाईवरून?—म्हातारे आहेत का ते?
चंदाः—नाहीं. अगदीं तरणेबांड आहेत. खूप गोष्टी सांगत होते तिकडच्या. मला कंटाळा आला ऐकायचा. पण बाबा कांहीं जाऊं देईनात. चहा आणायला सांगतें म्हटलं अन् निसटलें तिथून.
कृपाः—लढाईच्या गोष्टींचा कंटाळा आला तुला चंदा?
चंदाः—आतां तूं ऐकशील तेव्हां कळेल तुला. चहा पाठवून द्या म्हणून भटजीला सांगितलं अन् सरळ इकडे आलें. ( हातांतलें घड्याळ पाहून ) आजचा सिनेमा चुकलाच म्हणायचा. आतां आपण उद्यां जाऊं पुष्पा. ( इकडे तिकडे पाहून ) खंडेराव कुठं गेले?
पुष्पाः—जो उठतो तो विचारतो 'खंडेराव कुठं गेले?' एवढं काय अडलं आहे खंडेरावावांचून?
चंदाः—आतां बाबा आले आणि त्यांनीं विचारलं तर काय सांगायचं त्यांना? अगदींच घाबरट प्राणी आहे म्हणून त्याची काळजी घ्यावी लागते मला.
कृपाः—तुला? ( हंसते ) तूं काळजी घेणार खंडेरावांची?
चंदाः—अनाथ आहे बिचारा, आईबाप कुणी नाहींत. कुणी बायको मिळेल अशी आशाही वाटत नाहीं—
पुष्पाः—मग तूं कर कीं लग्न त्याच्याशीं.
चंदाः—मला लग्न करायचं असलं तर नवरा पाहिजे आहे—कुक्कुबाळ नको आहे.
कृपाः—( अर्धवट स्वगत ) कुक्कुबाळ! कॉलेजांत असतांना पाहिलं असतंस त्यांना तर असं म्हटलं नसतंस. एक खंदा भांडखोर विद्यार्थी होता तो—
चंदाः—मग आतां कां अशी बोबडी वळली?
कृपाः—तें त्यांनाच विचार ना. ( खंडेराव येतो )
चंदाः—आलांत? कुठं गेला होतां एकदम? ही माझी आई काय म्हणते ऐकलंत? तुम्हीं म्हणे मोठे भांडखोर होतां कॉलेजांत असतांना.
खंडेरावः—( दूर उभा राहून ) असं म्हणत असत खरे सारे कॉलेजांतले लोक.
चंदाः—मग आतां काय झालं तुम्हांला?

**खंडेराव**:—कारकुन झालों आहें ना मी !
**पुष्पा**:—कारकुन झालांत म्हणून काय झालं ?
**खंडेराव**:—तें कारकुन झाल्याशिवाय कळायचं नाहीं.
**चंदा**:—मग सोडा तर ही कारकुनी.
**खंडेराव**:—आणि काय करूं ?
**चंदा**:—जा लढाईवर.
**खंडेराव**:—( कोपऱ्यांतल्या खुर्चीवर बसून ) लढाईवर ! गेलों असतों ! कारकुन व्हायच्यापूर्वी ती संधी आली असती तर लढाईवरच गेलों असतों. पण आतां कारकुन होऊन चुकलों—चुकलों कसला—अगदीं बरोबर कारकुन होऊन बसलों. आतां या जन्मीं तरी लढाईवर जायची आशा नको.
**कृपा**:—कशाला सतावतेस त्यांना चंदा ?—( खंडेराव आपल्या टेबलाजवळ जाऊन बसतो ) त्यांना करूं दे आपलं काम. तूं जा तिकडे ब्रह्मदेशच्या गोष्टी ऐकायला. ( पुष्पाला ) अन् तूंही जा—
**पुष्पा**:—कां ? ( खंडेराव आणि कृपा या दोघांकडे आळीपाळीनें पहाते ) तुला नाहीं वाटतं यायचं तिकडे ऐकायला !
**चंदा**:—माझं ऐकून झालंय भरपूर—( सर सोमनाथ आणि कॅप्टन शंकरराव येतात ) घ्या—तेच आले इकडे.
**शंकरराव**:—असे मोठे बिकट प्रसंग होते ते !—आपल्याला त्यांची कल्पना असेल. त्या वेळच्या लढाईत अन् आजच्या लढाईत जमीनअस्मानाचं अंतर आहे खरं; पण साधारणपणें आपल्याला कल्पना करतां येईल. खरा आणीबाणीचा प्रसंग होता तो. सारखीं विमानं घोंघावत होतीं डोक्यावर अन् आम्हीं तर अगदीं उघड्यावर होतों—
**सर सोम०**:—बसा ना. लेडी सोमनाथ, कॅप्टन शंकरराव गोखले. ही हिची बहिण पुष्पा—कसली बहिण बरं—चुलत कीं मावस कीं अशीच कांहींतरी—अन् हे खंडेराव—
**खंडेराव**:—( दचकून एकदम उठून ) जी.
**सर सोम०**:—मी हांक मारली नाहीं तुम्हांला. मी ओळख करून देतों आहें यांची. हे कॅप्टन शंकरराव गोखले अन् हे माझे सेक्रेटरी खंडेराव खरे. ( खंडेरावाला ) बसा तुम्हीं. चालूं द्या तुमचं काम. ( शंकररावांना ) या बसा

कॅप्टन. ( कृपेला ) बेस ना. हे कांहीं आपल्याला परकी नाहींत. यांचे वडील आणि मी सहाध्यायी. मराठी शाळेंत आम्हीं बरोबर होतों दोघे. यांचे आजोबा त्यावेळीं आमच्या गांवीं रहात होते. यांचे आजोबा तिथं—कोण होते बरं ?

**शंकरराव**ः—मामलेदार होते वाटतं ?

**सर सोम**ः०—अवल कारकून होते. पुढं झाले ते मामलेदार. मोठा करारी माणूस.

**शंकरराव**—माझे वडीलही तसेच होते. आम्हीं मुलंसुद्धां त्यांना थरकांप भीत होतों. अगदीं मिलिटरी शिस्त होती त्यांची—

**सर सोम०**ः—असं ! पण लहानपणीं तो अगदींच बावळट होता. मराठी शाळा सुटल्यानंतर त्याची माझी कांहीं भेट झाली नाहीं—

**कृपा**ः—माणसाचा स्वभाव केव्हां कसा बदलतो तें कांहीं सांगतां यायचं नाहीं. ( खंडेराव वळून तिच्याकडे रोंखून पहातो ) लहानपणीं मर्द असलेलीं माणसं जर पुढं बावळट झालेलीं दिसून येतात, तर लहानपणीं बावळट असलेलीं माणसं हातीं अधिकार आल्यावर पुढं कां कर्दनकाळ होऊं नयेत ?

**शंकरराव**ः—खरं आहे तुमचं म्हणणं. मी देखिल लहानपणीं जरा भित्राच होतों. बाबांची जरब होती ना मोठी कडक. पण आतां लढाईवर गेलोंच कीं नाहीं ! लढाईवर जाईपर्यंत मला असं वाटलं नव्हतं, कीं मी लढाईवर जाईन. सावरकरांचं व्याख्यान ऐकलं, तात्कालिक स्फूर्ति आली. म्हटलं पहावा प्रयत्न करून— अर्ज टाकला, मंजूर झाला, किंग्स् कमिशन् मिळालं—

**पुष्पा**ः—अग बाई, किंग्स् कमिशन् !

**शंकरराव**ः—हो, किंग्स् कमिशन्. व्हाइसरायचं कमिशन नव्हे—किंग्स् कमिशन मिळालं नि लगेच लढाईची संधिही मिळाली.

**पुष्पा**ः—असं का ! तसंच पाठवलं वाटतं तुम्हांला लढाईवर ?

**शंकरराव**ः—छे, छे, तसंच कसं पाठवतील ? आधीं शिक्षण घ्यावं लागतं ना ? मोठ्या गमतीच्या गोष्टी आहेत त्या. पण शिक्षण पुरं झाल्याबरोबर अगदीं अव्वल लढाईत घुसायला फार थोडयांनाच मिळतं.

**चंदा**ः—कुठं झालं तुमचं हें शिक्षण ?

**शंकरराव**ः—हें पहा, या फौजी कथा आहेत. अशा सरसहा सांगतां येत

नाहींत. काय सांगायचं अन् काय न सांगायचं याचे कांहीं नियम आहेत. ते नियम पाळणं ही पहिली फौजी शिस्त आहे—

**सर सोम०:**—अगदीं बरोबर आहे. या आमच्या चंदेला मोठी आवड आहे फौजी जीवनाची. दुर्दैव माझं अन् तिचं, कीं ती मुलगी आहे—नाहींतर यावेळीं तिलासुद्धां किंग्स् कमिशन् मिळालं असतं.

**शंकरराव:**—अगदीं निःसंशय. आपलं वजनच आहे तसं. मला वाटतं आपण लढाईवर आलां असतां—

**सर सोम०:**—आलों असतों, पोरा, आलों असतों, पण हें वय आड येतंय. असं सळसळतंय माझं रक्त. वर्तमानपत्रं वाचूंसुद्धां नयेत असं वाटतं. त्या एकेक हकीकती वाचल्या कीं जीव कसा तळमळूं लागतो. तिकडे लढाई चाललेली आहे नि मी इथं मुडद्यासारखा डांबून पडलों आहें या घरांत. कसं सहन व्हावं हें ? काय लढाईवर कुणी म्हातारे कधीं गेले नव्हते ? ऐशीं वर्षांचे लॉर्ड रॉबर्टस् जनरल होते. मला अजुन पुरतीं—

**चंदा:**—हं हं बोलूं नका—आईला वाईट वाटेल.

**कृपा:**—चंदे, किती वेळ तुला मी सांगितलं कीं मला ‘ आई ’ म्हणूं नकोस म्हणून.

**चंपा:**—पण आहेस ना तूं माझी आई ?

**सर सोम०:**—गप बैस चंदे. तेव्हां काय म्हणत होतों मी—

( खंडेराव एकदम उठून एक कागद हातीं घेऊन सर साहेबांच्या जवळ भीत भीत उभा राहतो )

**सर सोम०:**—काय आहे ?

**खंडेराव:**—हें पत्र असंच पाठवायचं का ? मला वाटतं यांत कांहींतरी चूक आहे.

**सर सोम०:**—पाहूं. ( कागद त्याच्या हातांतून घेऊन ) आतां काय सांगावं—लेडी नसरवानजीच्या मजकुरावर गव्हर्नरचं नांव घातलंत ?

**खंडेराव:**—चुकलं वाटतं.

**सर सोम०:**—मी सुद्धां पाहिलं नाहीं आणि सही केली. आतां हीं दोन्हीं पत्रं पुन्हां टाईप करा.

**खंडेराव:**—जी—( जाऊन आपल्या जागीं बसतो )

**शंकरराव**:—आपण लॉर्ड रॉबर्टस्‌च्या वयाबद्दल कांहीं बोलत होतां.

**सर सोम०**:—हो. ती लॉर्ड रॉबर्टस्‌ची दृष्टी कांहीं आजच्या जनरल्स्‌ना नाहीं. डुमॉरियरचं तें नाटक—'इंग्लिशमन्स्‌ होम' वाटतं त्याचं नांव—तें पाहिलं त्यांनीं. कसे दुबळे झाले होते इंग्लिशमन्‌ याचं मोठं सुंदर चित्र काढलं होतं त्या नाटकांत. तें नाटक पाहून लॉर्ड रॉबर्टस्‌नीं सारं इंग्लंड हलवून जागं केलं. म्हणजे ती परिस्थिती त्यांना आधीं कळली नव्हती असं नाहीं—पण पार्लमेंटमधें बसणाऱ्या सुखाडलेल्या मुत्सद्यांना त्या परिस्थितीची जाणीव नव्हती. ती जाणीव करून द्यायला तें नाटक उपयोगीं पडलं. नाहीं तर हे आमचे नाटकवाले अजून सौभद्र शाकुंतल करताहेत. लढाई आली आहे अगदीं दाराशीं तरीसुद्धां गाण्याचे जलसे करीत बसलेयत. यावेळीं अशीं नाटकं पाहिजेत—डुमारियरच्या नाटकासारखीं नाटकं पाहिजेत.

**शंकरराव**:—अगदीं बरोबर. परवांच मी नाटकाला गेलों होतों—

**पुष्पा**:—तुम्हीं नाटकं पहातां ?

**शंकरराव**:—आम्हीं लढवय्ये असलों म्हणून काय माणूस नाहीं ? तिकडे विलायतेंत पहा—मुद्दाम नाटकं करताहेत आम्हां लढवय्या लोकांसाठीं.

**सर सोम०**:—पण तीं डुमॉरियरचीं नव्हेत. ते सुद्धां असेच.

**शंकरराव**:—लढाईवर जाणाऱ्या शिपायांना कांहीं करमणूक तर पाहिजे ! मरण समोर दिसलं म्हणजे चैनीची एकदां भरपूर करून घ्यावी असं नाहीं का वाटत कुणाला ?

**सर सोम०**:—आम्हांला असं वाटलं नव्हतं. आमचं लक्ष त्यावेळीं एकाच गोष्टीवर असे—रणांगण. लढायचं किंवा मरायचं. एकदां मरायचं ठरवलं कीं माणूस बेहोष होतो. अन्‌ तसा कमालीचा बेहोष झाला तरच शिपाई लढाईवरून जिवंत परत येतो. ती बेहोषी ज्याच्या नसांनसांतून भिनली असेल त्याला असल्या नाटक तमाशांची तमा वाटत नाहीं. आमच्या वेळीं नव्हती कांहीं असलीं ढोंगं. सुखासमाधानाच्या काळीं शिपायाला करमणूक हवी. पण या अस्सल लढाईच्या काळांत कशाला रे हवेत हे नाटक सिनेमा ! उद्यां जय मिळवून या आणि मग खुशाल चैनचान करा म्हणावं.

**शंकरराव**:—आपलं म्हणणं खरं आहे. पण तो काळ वेगळा होता, आजचा काळ वेगळा आहे. त्यावेळीं कुठं चुकून एकादं विमान दिसत

होतं. एकादं झेपेलिन आलं म्हणजे केवढी गडबड उडत होती. आतां टोळधाडीसारखीं विमानं भिरभिरताहेत आकाशांत. त्यावेळीं आपण खंदकांत बसत होतां, आतां आम्हीं अस्मानांत उडतों आहोंत. तोफांची सुद्धां आतां किंमत राहिली नाहीं. गोळे पडताहेत ते विमानांतून. अन् टँक्स्—आपण पाहिलीं आहेत तीं टँक्स् ?

**पुष्पाः**—मी पाहिलीं आहेत.

**शंकररावः**—कुठं ?

**पुष्पाः**— सिनेमांत.

**शंकररावः**—त्याच्यावरून नाहीं कल्पना यायची कुणाला. नुसता आवाज ऐकून पाणी होतं काळजाचं. केवढं तें प्रचंड धूड ! अशीं शेंकडों धूडं जेव्हां चालू होतात—

**खंडेरावः**—(एकदम येऊन) हें धूड—नव्हे, हें पत्र आजच गेलं पाहिजे का ?

**सर सोम०ः**—सध्यां राहूं देत तीं पत्रं.

**खंडेरावः**—जी—( जाऊं लागतो )

**सर सोम०ः**—असं पहा खंडेराव, तुम्ही इकडे या. या इथं बसा.

**खंडेरावः**—मी ! इथं ! छे ! नाहीं !

**सर सोम०ः**—एकदां ऐका या लढाईच्या गोष्टी.

**खंडेरावः**—छे. लढाईची फिल्म सुद्धां पहात नाहीं मी.

**पुष्पाः**—वारे मर्द !

[ कृपा खंडेरावाकडे रोखून पहाते—तो अस्वस्थ होतो आणि तिच्या नजरेच्या इषाऱ्यानें त्या घोळक्यांत बसतो ]

**शंकररावः**—प्रत्यक्ष रणांगणावर गेल्याखेरीज आजचं रणांगण कळायचं नाहीं. पूर्वीचा तो सारा जमाना बदलून गेला आहे—

**सर सोम०ः**—जमाना कितीही बदलला असला तरी लढवय्याच्या वृत्तींत कांहीं फरक पडायचा नाहीं. ती लढवय्याची खुमखुम नसांनसांतून सळसळत असली कीं चैनीची कल्पनासुद्धां कधीं मनांत यायची नाहीं. ते जुने प्रकार बदलले असतील—मी नाहीं म्हणत नाहीं—या नव्या प्रकारांची मला पुरेशी कल्पनाही नसेल कदाचित्—तेंही मी नाहीं म्हणत नाहीं—पण माणसाच्या अंतःकरणांतल्या जळजळित लढाऊ वृत्तींत काळाच्या चढत्या पावलाबरोबर

फरक झाला आहे असं कुणी :मला सांगितलं, तर मी त्याला गाढव म्हणेन. म्हाताऱ्याचं रक्त अशा वेळीं कसं सळसळतं हें म्हातारपण आल्यावांचून तुम्हांला कळायचं नाहीं. हा देह म्हातारा झाला असला तरी मन म्हातारं झालेलं नाहीं. मला दुःसह होतंय तें हेंच, कीं तिकडे लढाई सुरू आहे नि मी इकडे स्वस्थ बसून राहिलोंय. रोज नुसत्या लढाईच्या बातम्या वाचतोय. मन सारखं धांवतंय तिकडे पण नाइलाज होऊन बसलाय. अन् हे तरणेबांड ( खंडेरावाकडे बोट करून ) लढाईच्या फिल्मस् सुद्धां पहात नाहीं म्हणे !

**खंडेराव**:—उद्यांपासून फिल्म पहायला सुरवात करतों. लढाईच्या सुद्धां फिल्मस् एकदां पाहून घेतों. ( चंदा आणि पुष्पा हंसतात ) हंसूं नका कुणि ! हंसलं कीं माझं मन डळमळूं लागतं. अन् त्यांतून या हंसताहेत—( बसल्या जागीं अस्वस्थपणें क्षणभर हालचाल करून सर्वांकडे पहात पुन्हां गंभीर होऊन बसतो. )

**शंकरराव**:—आतां थोडीच रजा आहे मला. पुन्हां आसामच्या सरहद्दीवर जाऊन हजर व्हायचा हुकूम आला आहे. आहें तोंपर्यंत रोज आपली भेट घेणार आहें. तेवढीच नवी स्फूर्ति मिळेल मला. किती झालं तरी आपण अनुभवी माणसं—आपल्या तोंडच्या चार शब्दांनीं सुद्धां मनावर केवढा परिणाम होतो तें आत्तांच पाहिलं—( खंडेरावांकडे एक कटाक्ष फेकतो. पुष्पा आणि चंदा एकमेकांना डिंवचून खिदळून हंसतात ) एवढंच उदाहरण पुरेसं आहे. आतां घेऊं आपली रजा ? पुन्हां यायची परवानगी आहे ना मला ?

**सर सोम०**:—वा वा ! हें काय विचारतां ! कोणत्याही फौजी माणसाला माझं घर केव्हांही उघडं आहे.

[ कॅप्टन शंकरराव उठतो—फौजी पद्धतीनें सॅलूट करतो—सर सोमनाथ उलट सॅलूट करतो—शंकरराव जायला निघतो—चार पावलें जाऊन पुन्हां मागें वळतो आणि कृपेसमोर येऊन उभा राहतो. ]

**शंकरराव**:—क्षमा करा हं लेडी सोमनाथ—आपला निरोप घ्यायला मी विसरलों याची क्षमा करा. सरसाहेबांची परवानगी असली तरी घराच्या मालकीण आपण आहांत. आपल्या परवानगीशिवाय—

**कृपा**:—छे, छे, जी सरसाहेबांची तीच माझी परवानगी. अन् परवानगी तरी कसली ? आपण रोज आलांत तर मोठे उपकार होतील आमच्यावर.

या आमच्या खंडेरावांना सुद्धां थोडी स्फूर्ति येईल तुमच्यामुळं. ( शंकरराव लवून नमस्कार करतो—ती उलट नमस्कार करते—तो जाऊं लागतो तोंच ) जरा थांबा. या आमच्या चंदेला तुम्हीं पाहिलं ! जरा चांगला परिचय करून घ्या हिचा अन् हिला लढाईवर कुठं नेतां येईल तर तसं कांहीं तरी—

**चंदाः**—( ओरडून ) आई, थट्टा करूं नकोस. बायकांना नेत नसतील लढाईवर पण तूं अशी थट्टा करूं लागलीस तर क्रोज क्रॉप् करून कोट पाटलोण घालून पुरुष म्हणून लढाईवर जाईन.

**खंडेरावः**—वा, वा, शाबास.

**चंदाः**—तुमच्यासारख्या भेकडाची शाबासकी नको आहे मला.

**खंडेरावः**—जी.

**शंकररावः**—( चंदेला नमस्कार करून ) उद्यां भेट होईलच आपली.

**चंदाः**—नमस्कार नको मला. सॅलूट करा.

[ शंकरराव दचकतो, सॅलूट करतो—ती उलट सॅलूट देते आणि शंकरराव घाईघाईनें निघून जातो. खंडेराव हंसायला सुरवात करतो, तोंच कृपेकडे नजर गेल्यामुळें एकदम थांबून गंभीर होतो. ]

**सर सोम०ः**—अशीं माणसं आहेत म्हणून अजून आशा वाटते. मोठा उत्साही मुलगा—( कृपेकडे वळून ) नाहीं ? पण अशीं कितीशीं माणसं आहेत ? आज लढाईवर माणसांची जरूरी आहे नि खर्डेघाशीसाठीं आमची धडपड चालली आहे. कसं होणार ? कशीं माणसं मिळणार ? हें संकट आतां हिंदुस्थानच्या सरहद्दीवर आलंय—मला कां जातां येऊं नये लढाईवर ? ( खंडेरावासमोर येऊन ) सांग ना—मला कां जातां येऊं नये लढाईवर ?

**खंडेरावः**—मी तेंच म्हणतों, कां जातां येऊं नये लढाईवर ?

**चंदाः**—अन् मी पण तेंच म्हणतें, कां मला जातां येऊं नये लढाईवर ?

**कृपाः**—सारेच निघालेयत लढाईवर !—

**खंडेरावः**—सारेच निघालेत लढाईवर—खरंच ! कां सारेच निघालेयत लढाईवर ?

**सर सोम०ः**—तें कळायला तुला पुन्हा एकदां जन्म घ्यायला हवा. जा. आतां तीं पत्रं टाईप करून ठेव. कसा बेचैन झालाय जीव. काय करूं ! ( असें म्हणत म्हणत निघून जातो. )

कृपाः—असा बेचैन झालाय जीव. काय करूं ?

पुष्पाः—एक काव्य कर. कवयित्री आहेस ना तूं—नव्हे—कवयित्री होतीस ना तूं ? तुला नाहीं का स्फूर्ति येत ? वीरश्रीचं एकादं काव्य लिही ना.

कृपाः—लिहिलंय एक मी. पण तें वीरश्रीचं आहे कीं नाहीं कोण जाणे.

पुष्पाः—काय लिहिलंयस ?

कृपाः—ऐक.

उभ्या जगाला आग लागली चोरांचं सैंवर ।
दोस्त हो चला लढाईवर ॥
फुलतात बगीचे जखमांचे ज्या स्थळीं ।
रुधिराचा पडतो सडा सदा भूतलीं ।
हरघडीस घेती जीव जिवांचे बळी ।
अस्मानांतुनि गळे खालती बॉंबांचें दहिंवर ।
दोस्त हो चला लढाईवर ॥
दणदणा सरपटे टँकांचा अजगर ।
मारिती भराऱ्या वीरहि मेघांवर ।
घोषानें ज्यांच्या थरथरतें अंबर ।
दुर्दैवांतुनि सुदैव येइल म्हणती कुणी नरवर ।
दोस्त हो चला लढाईवर ॥

[ ती हें पद म्हणत असतांना खंडेराव येऊन डोळयांत जीव आणून ऐकूं लागतो—पद संपतांच खंडेराव टाळया पिटतो. पुष्पा त्याला कोंपरखळी मारते—तो दचकून दूर होतो )

खंडेरावः—वाहवा ! याला म्हणावं काव्य. नाहींतर आमचे हल्लींचे कवी !- पुन्हां म्हणा पाहूं एकदां.

कृपाः—( त्याच्याकडे साभिप्राय नजरेनें पाहून ) आतां पुन्हां ! छे !' ( निघून जाते )

खंडेरावः—( ती जात असतांना ) वाहवा ! शाबास ! बहोत खाशी !

— पडदा —

# अंक दुसरा

[ **स्थळ**—पहिल्या अंकाप्रमाणेंच. रामनाथ आणि
सर सोमनाथ बोलत बोलत प्रवेश करतात. ]

**सर सोम०**:—तुला शंभर वेळ मी सांगितलं, पण तें पटत नाहीं. किती चिठ्या द्यायच्या तुला ? त्यापेक्षां सरळ लढाईवर कां जात नाहींस ? ते कॅप्टन शंकरराव आले आहेत ते पाहिलेस ना ? कारकुनी करून हें वैभव मिळालं असतं का ?

**रामनाथ**:—आतां एकदां कारकुनी पत्करली आहे ती कांहीं सोडतां येत नाहीं. त्यांतूनच कांहीं मार्ग निघाला तर पहायचा.

**सर सोम०**:—कारकुनीच करायची असली तर फौजेंतली कारकुनी कर. होतां होतां शिपाईबाणा अंगीं बाणूं लागेल. केव्हां तरी एकदां धाडस केलं पाहिजे. धाडसाशिवाय वैभव मिळत नाहीं—

**रामनाथ**:—पण वैभव कुठं मागतों आहें मी ? पोटभर अन्न मिळेल इतकी नोकरी असली म्हणजे झालं.

**सर सोम०**:—कसे रे तुम्ही हे ! कांहीं महत्त्वाकांक्षा कशा नाहींत तुम्हांला ? आपण कुणीतरी व्हावं जगांत आपला लौकिक व्हावा, चारचौघांच्या तोंडीं नांव व्हावं, असं कसं वाटत नाहीं तुम्हांला ! कारकुन आणि ढेंकुण दोन्ही सारखेच. दोघेही खुर्चीत असतात नि खुर्चीतच मरतात. खुर्चीतले ढेंकूण खुर्चीत बसणाराला जेवढा त्रास देतात तेवढाच तुम्हां कारकुनांचा त्रास होतो लोकांना. पकडायला गेलं तर सांपडत नाहीं—सांपडत नाहीं तेवढाच बचावतो—पण जो सांपडतो तो ठार मरतो. हें तुम्हां कारकुनांचं जिणं. दोघेही सारखेच परान्नपुष्ट. दुसऱ्याच्या रक्तावर लठ्ठ होणारे—

**रामनाथ**:—मग चिठ्ठी देतां ना तेवढी ?

**सर सोम०**:—नाहीं. चिठ्ठी द्यायची तर रिक्रुटिंग ऑफिसरला देईन. आहे कबूल ?

**रामनाथ**:—तेवढा नाहीं धीर होत. घर सोडून जाणं मोठं कठिण होतंय. त्यांतून मी कुटुंबवत्सल माणूस. मी गेलों आणि तिकडे मेलों तर मागं बायकोचं काय होईल—

**सर सोम०ः**—पेन्शन् मिळेल तिला. फौजी नोकरीशिवाय कुठल्याच नोकरींत बायकोला पेन्शन् मिळत नाहीं हें तरी माहित आहे का तुला?

**रामनाथः**—ते खरं, पण मरायची तयारी करून नोकरीला जायचं हेंच मोठं कठिण वाटतं.

**सर सोम०ः**—अन् कारकुनींत तरी अमरपट्टा कुठं कुणी दिला आहे! प्लेगांत मेले, इन्फ्ल्यूएन्झांत् मेले, त्यांची संख्या पाहिली तर लढाईंतसुद्धां इतके मेले नसतील. असं घरबसल्या नांवनसतं मरण येण्यापेक्षां कांहीं तरवार गाजवून मेलेलं काय वाईट! मेलास तर स्वर्गाला जाशील, जगलास तर वैभव भोगशील. गीतेंत सुद्धां असंच कांहीं सांगितलं आहे ना! ती आमची चंदा पहा, लढाईवर जाण्यासाठीं सारखी नाचतेय. मी हा म्हातारा पण तिकडे लढाई सुरू असतांना इथं स्वस्थ बसून राहणं मला दुःसह झालंय. जाणारे आहेत त्यांना कुणी पाठवीत नाहीं आणि या तुझ्यासारख्यांना जा जा म्हणताहेत लढाईवर. असं हें दुर्दैव आहे आमचं.

**रामनाथः**—मग ती केव्हां देतां नोट?

**सर सोम०ः**—नोट मिळायची नाहीं. अगदीं शेवटचं सांगतों, मी प्रतिज्ञाच केली आहे मुळीं, नोट द्यायची तर रिक्रुटिंग ऑफिसरला. यापुढं दुसऱ्या कुणाला नोट द्यायची नाहीं.

**रामनाथः**—एवढी एक नोट मला द्या आणि मग प्रतिज्ञा करा. हें शेवटचं मागणं—यापुढं केव्हां सुद्धां नोट मागणार नाहीं आपल्याकडे.

**सर सोम०ः**—नाहीं. नाहीं. नाहीं. त्रिवार नाहीं. सक्तीचा कायदा कां करीत नाहीं सरकार कोण जाणे! प्रत्येक सज्ञान माणसाला लढाईवर पाठवलं पाहिजे—सक्तीनं पाठवलं पाहिजे. एकदां संवय झाली कीं मग आपोआप आंगवळणी पडेल. ( कृपा येते ) आतां जा पाहूं.

**कृपाः**—काय झालं एवढं रागवायला?

**सर सोम०ः**—आतां तूं आलीस! प्रत्येक जण मला सतावायला निघाला आहे. असं डोकं भणाणून गेलं आहे माझं—कुणीच माझं ऐकत नाहीं.

**कृपाः**—काय ऐकत नाहीं?

**सर सोम०ः**—या रामनाथाला म्हटलं लढाईवर जा, तर कारकुनींत प्रमोशन मिळण्यासाठीं नोट मागतोय माझ्याकडे. कोणत्या तोंडानं मी नोट देऊं!

मी एक फौजी पेन्शनर आहे. या लढाईच्या काळांत मी कारकुनीला उत्तेजन देतों आहें असं दिसून आलं तर याचा तो साहेब काय म्हणेल मला ?

कृपाः—एकदां देऊन टाका ना एक नोट.

सर सोम०ः—कां ? तुझे सुद्धां कान फुंकले वाटतं यानं ? ती चंदा म्हणते तें खरं वाटूं लागलंय मला आतां ! तें कांहीं नाहीं, फौजी माणसाशिवाय यापुढं कुणाला सुद्धां या घरांत येऊं द्यायचं नाहीं असंच ठरवून टाकलं पाहिजे.

कृपाः—म्हणजे एकटे कॅप्टन गोखले तेवढेच येतील मग.

सर सोम०ः—हो. तेवढेच येऊं देत. दुसरे कुणी नकोत. त्यांना सांगणार आहें मी, असेच कुणी त्यांचे जोडीदार असले तर त्यांना घेऊन या म्हणावं. एकादा 'प्रायव्हेट' असला तरी चालेल पण कारकून नको, हेड् क्लार्क नकोत सुपरिन्टेंडण्ट सुद्धां नको—या खुर्चीतल्या ढेंकणांतला कुणी सुद्धां नको या घरांत.

रामनाथः—मग जाऊं तर मी ?

सर सोम०ः—हो, जा. आत्तांच्या आत्तां निघून जा इथून. ( कॅप्टन गोखले येतो ) या कॅप्टन, तुमचीच वाट पहात होतों मी.

शंकररावः—इथं आलं म्हणजे अगदीं बराकींत असल्यासारखं वाटतं. केव्हां आसामांत जाईन असं मला झालंय. तोंपर्यंत इथं येतों आहें म्हणून चार फौजी गोष्टी कानावर पडताहेत. कॉलेजांतले ते जुने दोस्त भेटले अन् त्या चेंडूफळीच्या गोष्टी निघाल्या म्हणजे अशी चीड येते त्यांची—दुसऱ्या गोष्टीच नाहींत बेट्यांच्या. एक 'स्पोर्टस्' किंवा एक—जाऊं द्या. आपल्या-सारख्या वडील माणसांसमोर—त्यांतून फौजी माणसासमोर नकोतच त्या गोष्टी.

सर सोम०ः—( रामनाथला ) अजून गेला नाहींस ?

रामनाथः—जाऊंच तर ?

सर सोम०ः—हो, जा-जा-जा. एकदां इथून तोंड काळं कर. ( रामनाथ जातो ) अगदीं शिसारी येते असल्या माणसाची. कसे नामर्द बनले आहेत एकाहून एक ! बसा ना कॅप्टन. ( कृपेला ) अन् तूं कां उभी राहिलीस ? ( दोघेंही दोन बाजूला बसतात ) ( शंकररावला ) मग कसं काय कॅप्टन—काय म्हणते आमची चंदा ?

शंकररावः—ती काय म्हणणार म्हणा ! पण माझं सारं लक्ष लागलंय

तिकडे सरहद्दीकडे. आतां थोडेच दिवस राहिले. ऑक्टोबरच्या अखेरीला बहुतेक जावं लागेल—

**सर सोम०**:—म्हणूनच मी म्हणत होतों, कीं जायच्यापूर्वी एकदां तुमचं लग्न उरकून घेतलं असतं म्हणजे माझा जीव खालीं पडला असता. ( कृपेला ) काय म्हणते चंदा ?

**कृपा**:—सोय आहे का तिच्यापुढं बोलायची ? लढाईवर जायचं एक वेड शिरलं आहे ना तिच्या डोक्यांत ?—

**शंकरराव**:—तें असं आहे सर साहेब, शिपायाचं जिणं म्हणजे काय आहे हें आपण जाणतां. जिणं आणि मरणं यांच्या गर्दीतून वाट काढायची असते आम्हां शिपायांना. त्या जिण्यामरण्याची एकदां विल्हेवाट लागल्याशिवाय लग्नाची कल्पनाच येत नाहीं मनांत.

**कृपा**:—तेव्हांच वाटतं प्रत्येक छावणीजवळ शिपायाची एकेक वल्लभा असते म्हणतात तें.

**शंकरराव**:—ती आपली नुसती म्हण आहे बरं लेडी सोमनाथ ? या कारकुन लोकांनीं चालवली आहे ती आमची बदनामी. स्वतः नामर्द— दुसरे मर्द ठरूं लागले, कीं त्यांच्या मर्दपणाचा असा विपर्यास करतात.

**सर सोम०**:—बाकीं तें कांहीं अगदींच खोटं नव्हे. वीराचं जिणं मोठं विलक्षण असतं. म्हणूनच ना शिवाजीनं आठ बायका केल्या. आणखी तो कोण एक—पिटर दि ग्रेट वाटतं—( कृपा मान हालवते ) नव्हे ? असेल कुणी दुसरा ! त्याला म्हणे प्रत्येक जय मिळाला कीं एक आडलग्न करावं लागत होतं !

**कृपा**:—असं कांहीं नसतं तर वीरांच्या प्रेमाचीं काव्यंच निर्माण झालीं नसतीं. वीराचं जिणं कसं असतं याची कांहीं आम्हांला कल्पना नसते, पण वीराचं चित्र रेखाटायला गेलं कीं प्रेमाची बैठक आंथरल्याशिवाय काव्यच करतां येत नाहीं.

**शंकरराव**:—त्याचं कारण असं आहे—माफ करा हं—आपणसुद्धां कवियित्री आहांत, तेव्हां कवीच्या बाबतींत उणाअधिक शब्द गेला तर तो हिशेबीं धरूं नका. पण मी असं विचारतों, हे कवि कधीं लढाईवर गेले होते ? हीं लढाईचीं काव्यं जीं रचलेलीं असतात, तीं एक तर ऐकिंव गोष्टींवरून किंवा नुसतीं कल्पनेवर आधारून. वीररस म्हटला कीं तोंडीलावण्याला शृंगार कुठंतरी पाहिजेच. त्या शिवाय त्या वीररसाला

उठाव येत नाहीं. जगांतल्या साऱ्या तरुणी शिपायावर भाळतात असं कवी म्हणतात, तें जर खरं असतं, तर शिपायांचे जनानखाने शेंकड्यांनीं वाढले असते. तें आपलं नुसतं काव्य आहे एवढंच. ( चंदा येते ) हीं असलीं काव्यं लिहायच्या पूर्वी या कवींना एकदां रणांगणावर नेऊन आणलं पाहिजे. तो तिथला दणदणाट डोक्यांत शिरला कीं पुढं जन्मभर काव्यं करायचे नाहींत.

**कृपाः**—काय ग–( चंदेला ) तूं कां बोलत नाहींस ?

**चंदाः**—ऐकल्याशिवाय काय बोलूं ? हें कांहींतरी तुमचं काव्याचं चाललं आहे—मला काव्यांत कांहीं कळत नाहीं—काव्य मला आवडत नाहीं—अन् काव्याची चर्चा करणारीं माणसं तर मुळींच आवडत नाहींत.

**सर सोम०ः**—होय ना ? तर मग चालूं द्या तुमच्या लढाईच्या गोष्टी. तरुण माणसं लढाईच्या गोष्टी बोलूं लागलीं कीं म्हाताऱ्यांनीं तिथं राहूं नये ( कृपेला ) चल, यांना बोलूं दे अगदीं मोकळेपणानं.

**चंदाः**—तिला कशाला बोलावतां ? ती कांहीं म्हातारी नाहीं.

**सर सोम०ः**—चंदे, मला कळतं बरं ! हें मला आवडत नाहीं ! समजलं ? मी बाप आहें तुझा. परक्यादेखत असं बोलणं तुला शोभत नाहीं. ( कृपेला ) चल. ( कृपा आणि सर सोमनाथ जातात )

[ तीं दोघें जातांच चंदा अगदीं पुरुषी थाटांत कोचावर बसते—शंकरराव अस्वस्थ होतो—बोलायचा प्रयत्न करतो पण त्याला सुरवात करतां येत नाहीं—]

**चंदाः**—बोला ना आतां.

**शंकररावः**—काय बोलूं ?

**चंदाः**—बाबा निघून गेले—कां गेले माहित आहे ?

**शंकररावः**—कां गेले ?

**चंदाः**—काय सांगितलं होतं तुम्हांला आईनं ?

**शंकररावः**—म्हणजे लेडी सोमनाथनीं ना ? केव्हां सांगितलं ?

**चंदाः**—तुम्हीं आलांत त्या दिवशीं. माझ्याकडे नजर द्यायला सांगितलं होतं ना तुम्हाला ? इतके दिवस होऊन गेले, काय ध्वजा लावल्यात तुम्ही ?

**शंकररावः**—असं पहा, मी एक शिपाई गडी आहें. वाङ्मयाशीं माझा परिचय नाहीं. नाटकं कादंबऱ्या काव्यं मी कांहीं मिटक्या मारून वाचीत

नाहीं. कांहीं सक्तीनं वाचलीं आहेत तेवढींच. पण त्यांत मला गोडी लागली नाहीं.

**चंदाः**—मी कांहीं तुमची वाङ्मयाची परीक्षा घ्यायला आलें नाहीं.

**शंकररावः**—मग कसली परीक्षा घेणार माझी ?

**चंदाः**—तुमच्या शिपाईगिरीची. पण परीक्षा घ्यायची असं मीं कुठं म्हणतेंय ?

**शंकररावः**—मग काय म्हणतां ?

**चंदाः**—( एकदम उठून त्याच्यासमोर जाऊन ) अहो, बाबा निघून गेले—आई निघून गेली—तुम्हांला मला मुद्दाम एकटं ठेवून निघून गेले—ते कां ?

**शंकररावः**—कां ?

**चंदाः**—तुम्हीं देखील एक खंडेरावच दिसतां मला ! अहो प्रेम करा, माझ्याबरोबर प्रेम करा.

**शंकररावः**—असं का ?

**चंदाः**—असं का म्हणे ! कधीं वाघिणीच्या पिंजऱ्यांत शिरलां होतां ?

**शंकररावः**—नाहीं.

**चंदाः**—मग तुम्हांला तें समजायचं नाहीं.

**शंकररावः**—( उसनें अवसान आणून ) असं पहा, तसा मी कांहीं अगदींच कच्चा नाहीं. मी सुद्धां पाहिली आहे ही वाघिणीची जात. चिनी मुली पाहिल्या आहेत मी. पंधरा सोळा वर्षांच्या पोरी—हवामार तोफांवर काम करीत होत्या. अचुक पाडीत होत्या जपानी विमानं खालीं. आम्हांला सुद्धां कौतुक वाटत होतं त्यांचं. थक्क होऊन जात होतों आम्ही. त्या पोरींशीं लघळपणा करायची कुणाची छाती झाली नाहीं—काळ्यांची नाहीं अन् गोऱ्यांचीही नाहीं.

**चंदाः**—खरंय हें ? मग मी येतें तुमच्याबरोबर. त्या चिनी पोरींच्या काफिल्यांत द्या मला घुसडून.

**शंकररावः**—पण नाक आड येतंय ना हें !

**चंदाः**—मग कापून टाकतें हें नाक.

**शंकररावः**—अंऽहं. त्यानं अपशकून होईल. हवामार तोफांच्या काफिल्यांत जायचं असलं तर चीनांत जन्म घ्यावा लागतो.

**चंदाः**—तें कांहीं आतां शक्य नाहीं. (एकदम सुचल्यासारखें करून) नवऱ्याबरोबर बायकोला जायला देतात का लढाईवर ?

**शंकररावः**—नाहीं.

**चंदाः**—नशिब तुमचं. एवढाच एक चान्स् होता. आतां तुम्हांला कांहीं आशा नाहीं.

**शंकररावः**—कधींच आशा नव्हती मला. मला पाहिजे आहे ती बायको पाहिजे आहे. वाघिण नको—

**चंदा**—लढाईवर जाणाऱ्या माणसाला बायको हो कशाला पाहिजे ?

**शंकररावः**—पत्र पाठवायला. खरखरत्या लढाईच्या मैदानावर गोळयांच्या पुष्पवृष्टींत भाजून निघणाऱ्या शिपायाला, घरच्या प्रियकरणीचं पत्र म्हणजे अमृताचा शिटकाव वाटतो.

**चंदाः**—तुम्हांला कसं कळलं हें ? लग्न झालेलं नाहीं ना तुमचं ?

**शंकररावः**—अनुभवी माणसं म्हणतात तसं. मी आपली नुसनी कल्पना करतोंय !

**चंदाः**—काय कल्पना करतांहां ?

**शंकररावः**—अशी कल्पना करतोंय, मी लढाईवर गेलोंय, सारा दिवस शत्रूच्या माऱ्याखालीं बेजार झालोंय, छावणींत आलों न् पहातों तों एक पत्र ! कुणाचं पत्र ?—तिचं—माझ्या तिचं ! काय लिहितेय ती ?— ( थांबतो )

**चंदाः**—काय लिहितेय ती ?

**शंकररावः**—तें आतां तूं सांग ना.

**चंदाः**—असं होय ? मी कल्पना केली नाहीं. कशाला मी कल्पना करूं ? नवऱ्याला लढाईवर पाठवून मला घरीं बसायचं नाहीं. माझ्या खांद्याशीं खांदा भिडवून लढणारा नवरा पाहिजे आहे मला.

**शंकररावः**—घरांत ?—आपसांत ?—

**चंदाः**—नव्हे, लढाईच्या मैदानावर—धगधगत्या मैदानावर. पाहिलंय ना तुम्हीं तें ?

**शंकररावः**—हो पाहिलंय. तें पाहिलंय आणि त्याहीपेक्षां आणखी पुष्कळ पाहिलंय. तें जें कांहीं पाहिलंय तें सांगून कळायचं नाहीं. प्रत्यक्ष अनुभव

घेतला पाहिजे त्याचा. लढाईच्या गोष्टी ऐकून बोलतेयस, प्रत्यक्ष रणमैदान पाहिलं कीं फार निराळं बोलूं लागशील—

**चंदा:**—असं तुम्हांला वाटतं. पिढीजाद वीरांचं रक्त आहे हें—समजलं? चिनी पोरी तुम्ही पाहिल्या म्हणतां, त्या तरी माझ्यासारख्या पोरीच ना? त्यांनीं तुम्हांला थक्क केलं म्हणतां—

**शंकरराव:**—साऱ्या ब्रिटिश—साऱ्या अमेरिकन फौजेला थक्क केलंय त्यांनीं!

**चंदा:**—खरं ना हें? देशाच्या रक्षणासाठीं लढायला निघाला कीं चिनी काय कीं हिंदी काय—पुरुष काय कीं स्त्री काय—कुठलाही जातिवंत लढवय्या थक्कच करून सोडील साऱ्या जगाला. चिनी बायका लढल्या, रशियन बायका लढताहेत—जर्मनींतल्या बायका तेवढया चूल आणि मूल घेऊन बसल्यायत—आणि त्यांच्या जोडीला आम्हांला आणून बसवलंय.

**शंकरराव:**—कुणीं?

**चंदा:**—आम्हीं बायकांनीं. पत्रं लिहितों आहोंत नवऱ्यांना नुसतीं!—आणखी दुसऱ्या कुणाला तरी! लढाईच्या कामीं तेवढाच उपयोग आमचा. फारतर कपबशा विसळायच्या. त्याहीपेक्षां अधिक म्हणजे मलमपट्टया बांधायच्या. होय ना? ( खंडेराव येतो आणि मुकाटयानें ऐकत राहतो ) यापेक्षां जास्त कांहीं करतां यायचं नाहीं आम्हांला, असंच ना तुमचं म्हणणं?

**शंकरराव:**—आमचं म्हणणं कांहींच नाहीं. आम्हीं नुसते फौजी शिस्तीचे धनी आहोंत. चल म्हटलं कीं निघालों. सोड गोळी म्हटलं कीं ओढला घोडा. उभा रहा म्हटलं कीं राहिलों उभे—पड खालीं म्हटलं कीं पडलों आडवे. चला पुढं म्हटलं कीं चाललों धांवत. हटा मागं म्हटलं कीं घेतला पाय मागं—कसलाच विचार करीत नाहीं आम्हीं! हुकुम सुटला कीं त्याची तामिली करायची एवढंच आमचं ब्रीद. चंदाताई, आम्हीं शिपाई आहोंत, सेनापती नव्हे.

**खंडेराव:**—असं का? म्हणजे हे कारकुनासारखंच आहे वाटतं कांहीं तरी?

**चंदा:**—तुम्हाला नाहीं कळायचं त्यांत कांहीं. टेबलावरचं पेपरवेट खालीं पडलं तर छातींत धडकी भरणारे तुम्हीं, तुम्हांला कशाला हव्यायत या लढाईच्या गोष्टी?

**खंडेराव:**—नाहीं!—हे बोलत होते—कालच लढाईची फिल्म बघून आलों. म्हटलं आपणही थोड्या लढाईच्या गोष्टी बोलाव्या. हे कॅप्टनसाहेब

आले आहेत, म्हटलं यांच्याबरोबर बोललं तर तेवढंच उत्तेजन येईल—पण तूं तर मला मुळीं बोलूंच देत नाहींस.

चंदाः—काय मुक्ताफळं सांडताहेत! कारकुनाची न् शिपायाची बरोबरी करतां का? कारकुनाची हुकुमबजावणी आणि शिपायाची हुकुमबजावणी या दोहोंत जमीनअस्मानाचं अंतर आहे—

शंकरः—अगदीं बरोबर. शिपायाच्या जिण्याची कारकुनाला स्वप्नांत सुद्धां कल्पना यायची नाहीं—

खंडेरावः—खरं आहे तें. काल स्वप्नांत मी लढाई पाहिली—जागा झालों तों दरदरून घाम सुटला होता मला!

चंदा—एकूण पाणी आहे म्हणायचं तुमच्या अंगीं! ( कृपा येते ) आलीस? रहावलं नाहीं वाटतं? कशा आमच्या सुंदर लढाईच्या गोष्टी चालल्या होत्या—

कृपाः—नुसत्या गोष्टीच का?

चंदाः—नुसत्या गोष्टीच का म्हणे! शेक्सपिअरचं 'ऑथेल्लो' नाटक नाहीं वाचलंस वाटतं? नुसत्या गोष्टी सांगूनच ना त्या हबशानं ती अप्सरा पटकावली?

खंडेरावः—असं का? मला वाचलं पाहिजे एकदां तें नाटक. त्यांत आहेत ना त्या गोष्टी?

चंदाः—आतां काय सांगावं तुम्हांला? मुद्द्याची तेवढी गोष्ट कुठला नाटककार कधीं उघडपणें सांगत असतो का? त्या काय गोष्टी होत्या तेवढ्याच सांगितलेल्या नाहींत त्या 'ऑथेल्लो' नाटकांत.

कृपाः—चंदा, ही निंदा करतेयस शेक्सपियरची. बरं नव्हे हें! कुणी ऐकेल एकादा प्रोफेसर तर मस्तक फिरेल त्याचं.

चंदाः—नुसता शेक्सपियरच काय—सगळेच सारखे आहेत हे नाटककार. त्यांच्या गोष्टी कशाला हव्यात म्हणा. आम्हीं बोलत होतों लढाईच्या गोष्टी. तेवढ्यांत हे आले—कारकुन येतांच लढाईच्या गोष्टी थंडावल्या. नाहींशी करून टाकली पाहिजे ही कारकुनाची जात—

खंडेरावः—मग हिशेब कोण ठेवील तुमच्या खाण्यापिण्याचा न् सामानसुमानाचा? लढाईच्या कितीही तिखट गोष्टी बोललांत तरी कारकुनाचं तोंडीलावणं असल्याखेरीज लढाईचं ताट वाढलं जायचं नाहीं.

**शंकरराव**:—हेंच मोठं दुर्दैव झालंय. पुष्कळ लोक जाताहेत आमचे लढाईवर—पण ते कारकुन म्हणून. तोफेच्या तोंडीं जातों आम्हीं—मरून जाणार आहोंत आम्हीं—नि प्रमोशनंपेन्शनं खाऊन बसणार आहेत हे कारकुन—म्हणून जाताहेत लढाईवर कारकुन म्हणून—

**चंदा**:—मग आतां खंडेराव, कारकुन म्हणून तरी जा कीं लढाईवर.

**खंडेराव**:—त्याच विचारांत आहें मी—

**कृपा**:—खरंच का ? कंटाळा आला वाटतं या कारकुनीचा ?

**खंडेराव**:—नाहीं—तसं नाहीं कांहीं ! पण लढाईच्या कुठल्यातरी क्षेत्रांत गेल्याशिवाय या घरांत मला कायम ठाणं मिळायचं नाहीं. असं वाटूं लागलंय अलीकडे. तेव्हां मनाचा धडा करतोंय.

**चंदा**:—बांधून कुत्रं पारधीला नेऊन काय ध्वजा लावणार ?

**खंडेराव**:—कारकुन म्हणून जाणार ना मी ?

**शंकरराव**:—पण कारकुनाला देखिल धोका असतो तिथं.

**खंडेराव**:—पण आवाज ऐकूं येत नाहींत ना ?

**शंकरराव**:—येतात, आवाजसुद्धां ऐकूं येतात. गोळेसुद्धां पडतात कारकुनांच्या कचेरीवर.

**खंडेराव**:—तर मग विचार केला पाहिजे मला पुनः !

**कृपा**:—अर्थात् विचार केला पाहिजे. तुम्हीं गेलांत लढाईवर तर इथलीं कामं कोण करील ?

**चंदा**:—नि बाबाही गेले लढाईवर तर ?

**कृपा**:—तर तूंही जाशील—अन् मग मी इथं एकटी पडेन.

**चंदा**:—तर मग खंडेराव, हे लढाईचं वेड डोक्यांतून काढून टाकाच—

**कृपा**:—चंदे, मला समजतात बरं हीं बोलणीं. लढाईवर जाणार म्हणे ! आधीं हें काय झालं तें सांग ना.

**चंदा**:—यांनाच विचार ना.

**शंकरराव**:—अजून पुष्कळ बोलायचं आहे मला. पण त्यापूर्वी एकदां सरसाहेबांना भेटलं पाहिजे. आहेत ना ते आंत ? काय करताहेत ?—( असें म्हणंत म्हणत निघून जातो )

**चंदा**:—पाहिलंत ?—तुम्हीं आलांत नि हा असा घोंटाळा झाला. नुक्ती

कुठं सुरवात होत होती आमची बोलायची. अन् मग ते प्रपोज करणार होते मला—( मोठमोठ्यानें हंसते )

**कृपाः**—हंसायला काय झालं ?

**चंदाः**—तें तुझं काव्य आहे ना—लढाईवर जाणाऱ्या शिपायाचं विरहगीत.

**खंडेरावः**—मग म्हणा ना तें. मी ऐकलं नव्हतं कधीं. या लढाईच्या गरम पाण्यांत काव्याचं थंड विसावण जरा सुखाचं वाटेल.

**चंदाः**—गप्प बसा—तुम्हांला कळतंय का कांहीं काव्यांत ?

**खंडेरावः**—तसं म्हटलं तर थोडं कळतं—अन् केव्हां केव्हां कळतही नाहीं. पण या काव्याची संवय आहे मला—कित्येक वर्षं यांचीं काव्यं ऐकत आलों होतों ना ?

**कृपाः**—मला नकोत त्या काव्याच्या गोष्टी !

**चंदाः**—अगदीं बरोबर. प्रत्यक्ष काव्य समोर असतांना काव्याच्या गोष्टी कशाला करायच्या ? आतां म्हण पाहूं ! म्हण—म्हण—म्हण. ( ती कृपेला खुदळते )

[ कृपा चंदेला जवळ ओढून घेते आणि हळुहळु खालील गीत म्हणूं लागते ]

**दणदणे उभें मैदान चालला वीर ।**
**धांवला घेउनी तळहातावरि शीर ॥**
**गोळ्यांचा पाउस अस्मानांतुनि आला ।**
**हातिंचा सांडला त्याच्या बरची-भाला ॥**
**आसरा कुणाच्या ताज्याशा मुड्याचा ।**
**पाहुनी, पहुडला देह तया वीराचा ॥**
**सळसळे, जीव तळमळे, स्मरणिं आढळे तिची तसबीर ॥१॥**
**कुरवाळित तीच्या कुटिल कुंतलावरुनी ।**
**फिरवितां रुधिरिं माखला हात सावरुनि ॥**
**थरथरे बिचारी कांटा तनुवरि आला ।**
**हांसला वीर तो म्हणे-कसलि तूं बाला ॥**
**रक्तांत भिजविलें जीवन आमुचें सारें ।**
**रक्ताच्या अन्नें पोषण जगिं होणारें ॥—**

**कृपा**:—पुरे—आतां नाहीं पुढचं म्हणवत !—

**खंडेराव**:—याला म्हणावं काव्य. कशा या या कल्पना येतात तुम्हाला ! लढाईवर जाणाऱ्या शिपायाचं अंतरंग इतकं अचुक कसं ओळखतां आलं तुम्हांला ?

**चंद्रा**:—हें अचुक आहे कशावरून ? खंडेराव ही नुसती कल्पना आहे बरं. लढाईवर जायला निघाल तुम्ही, तेव्हांच हें चूक आहे कीं अचुक आहे तें सांगतां येईल तुम्हांला—

**खंडेराव**:—तें शक्य नाहीं. लढाईवर जाणाऱ्या विवाहिताचं विरहगीत आहे हें. मी हा असा फकीर—आगा नाहीं पीछा नाहीं—मेलों गेलों तर रडायला कुणी नाहीं—माझं विरहगीत एकच असणार—

**चंद्रा**:—आगे बढो—आगे बढो.

**खंडेराव**:—हो. आगे बढो ! कुठं पुढं जाणार मी ? काय आहे पुढं ? ही लढाई सुरू झाली आहे—किती माणसं मरताहेत कोण जाणे ! त्यांतलीं किती माणसं परत घरीं येणार आहेत कोण जाणे !—

**चंद्रा**:—नि इथं राहणार आहेत त्यांतलीं तरी किती जिवंत राहणार आहेत कोण जाणे ! वाटेल तिथं बॉंब टाकतात ना ते बेटे !

**खंडेराव**:—तेंही खरंच. वाटेल तिथं बॉंब टाकतात. उद्यां कदाचित या घरावर देखील बॉंब पडतील. कदाचित् मी त्यावेळीं इथं असेन. कदाचित नसेनही—

**चंद्रा**:—कदाचित नसालही तुम्ही, पण आम्ही असूं ना इथं ! नि आम्हीं इथं असतांना बॉंब पडला या घरावर—

**खंडेराव**:—नाहीं—नाहीं—नाहीं ! या घरांत राहूं नकोस तूं कृपा.

**चंद्रा**:—तूं ? आईला 'तूं' म्हणतां ?

**खंडेराव**:—चूक झाली माझी. घाबरल्यामुळं चट्कन म्हणून गेलों तसं. माफ करा हं बाईसाहेब.

**कृपा**:—आतां पुरे कराल हा तुमचा चारगटपणा ?

**चंद्रा**:—काय बोलतेस हें आई !—

**कृपा**:—( चिडून ) गप्प बैस. आई म्हणूं नकोस. किती वेळ सांगितलं तुला—मला 'आई' म्हणूं नकोस !

**चंदाः**—मला तरी ‘ आई ’ म्हणावंसं कुठं वाटतंय ? पण बाबांनीं लग्न केलं ना तुझ्याबरोबर ?

**कृपाः**—( दांत ओंठ खाऊन ) लग्न केलं ! लग्न केलं ! कां लग्न केलं माझ्या-बरोबर ? काय अधिकार यांना माझ्याशीं लग्न करायचा ? माझ्या-एवढी मुलगीसुद्धां असती यांना—

**चंदाः**—अग होती ! माझी वडील बहिण होती ती तुझ्याहून चार वर्षांनीं मोठी होती—

**खंडेरावः**—( आपल्याशींच ) चार वर्षांनं मोठी होती !

**चंदाः**—काय म्हटलंत ?

**खंडेरावः**—नाहीं, कांहीं नाहीं. तुमची मोठी बहिण या बाईसाहेबांपेक्षां चार वर्षांनीं मोठी होती. हिच्यापूर्वींच तिचं लग्न झालं असतं नि कदाचित तिला इतक्यांत एकदोन मुलंही झालीं असतीं नि ती माहेरीं आली असती म्हणजे त्या तिच्या मुलांनीं—

**चंदाः**—हिला ‘ आजी ’ म्हटलं असतं.

**कृपाः**—चंदे, खरंच आतां तुझ्या थोबाडींत भडकावीन अं !

**चंदाः**—मग मात्र माझी खरी सावत्र आई शोभशील.

**कृपाः**—बोला, बोला, वाटेल तें बोला. वाभाडे काढा माझे. आई म्हणा, आजी म्हणा, पणजी म्हणा—काय सुचतील तुम्हांला तीं तीं नांवं द्या मला !

**खंडेरावः**—रागावूं नका बाईसाहेब. एकदां गोष्ट होऊन गेली आहे खरी, आतां दांत ओंठ खाण्यांत काय अर्थ आहे ? माफ करा अं बाईसाहेब, मी असं म्हणायला नको होतं. मी नोकर आहें आपला—आपण मालक आहां—अतिक्रम झाला याची क्षमा असावी.

**कृपाः**—( रागानें रडकुंडीला येऊन ) क्षमा ! क्षमा ! क्षमा ! लाथ मारा—क्षमा मागा ! लाथ मारा—क्षमा मागा ! मला काय कळत नाहीं ? किती विनयाचा आव आणला तरी थुंकलेल्या शब्दांतलं वीष मला कसं झोंबल्या-शिवाय राहील ? आतां किती वेळ तोंड दाबून रहायचं ? ऐकलंस चंदे, यांचं माझं लग्न होणार होतं—

**चंदाः**—आं !

**कृपाः**—हो, हो ! यांचं माझं लग्न होणार होतं ! अगदीं लहानपणापासून

यांचं माझं लग्न ठरलं होतं. ती जाहिरात आली, माझं माथं भडकलं, हें असं झालं नि आतां ही तुमचीं बोलणीं ऐकून घ्यावीं लागताहेत मला.

**चंदा:**—असं !

**खंडेराव:**—तिचं काय ऐकतेस ?—नाहीं, नाहीं, तिचं काय ऐकतां ताई-साहेब ?—नाहीं नाहीं, त्यांचं काय ऐकतां ताईसाहेब ?

**कृपा:**—पुरे झालीं हीं ढोंगं.

**खंडेराव:**—ढोंगं कशीं ? जिवंत सत्य आहे हें. पूर्वीच्या शब्दानं—पूर्वीच्या भाषेनं आतां बोलतां येणं अशक्य झालंय मला. तें नातं बदललंय. आजवर तें नातं विसरून नोकरासारखा वागत आलों. केव्हां तरी हा असा भ्रम होतो बुद्धीला—वर्तमानकाळ विसरायला होतं, भूतकाळ नकळत पकड घेतो बुद्धीची, नि मग भविष्यकाळाकडे दृष्टि वळते तेव्हां साऱ्या भूतकाळाचा, साऱ्या वर्तमानकाळाचा चक्काचूर होऊन जातो !—नि मग त्या भविष्य-काळाची सुद्धां पर्वा वाटत नाहींशी होते. असा मरून गेलोंय मी चंदाताई. भूत, वर्तमान, भविष्य, तिन्ही काळ माझ्या लेखीं नाहींसे झाले आहेत. दिक्‌कालातीत होऊन बसलोंय मी—नि म्हणूनच हा असा झालोंय ! तरीही कुणाला माझी दया येत नाहीं.

**कृपा:**—आतां तोंड बंद ठेवाल एकदां ? ही समोर आहे एवढं तरी दिसतंय का तुम्हाला ? मुलगी आहे ही माझी—मी आई आहें तिची. दुर्दैवानं मी तिची आई झालें आहें पण या बिचारीनं माझं आईपण गाजवायला जागा दिली नाहीं मला—तिची तरी थोडी कदर करा. काय वाटेल तिला हें ऐकून ? बरोबरीची असलें,—हो, बरोबरीचीच तर काय !—चार दोन वर्षांच्या फरकानं कांहीं मोठेपण येत नाहीं !—बरोबरीची असलें तरी आतां वडील माणसाची जागा मिळाली आहे मला. त्या वडील माणसाचे हे असे धिंडवडे निघालेले तिला दिसले तर काय वाटेल तिला ?

**चंदा:**—कांहीं नाहीं वाटायचं. इतकी मी दुबळी आहें असं का वाटतं तुला ? बायकांच्या जातीला वडीलपण फार लवकर येतं, पुरुषांपेक्षां बायकांना वडीलपण लवकर जाणवतं, तसंच झालंय मला. यापूर्वी हें कांहीं माहीत नव्हतं मला—पूर्वीच कळलं असतं तर किती बरं झालं असतं !

**खंडेराव:**—काय बरं झालं असतं ?

**चंदाः**—आतां कशाला हवं तें ? नाजुक बायकांचा लवचिकपणा माझ्या ओळखीचा नाहीं. ब्रह्मदेवाच्या गल्लतीमुळं मी मुलगी झालेंय एवढंच ! इतर मुलींसारखी काव्याच्या दगडाखालीं मी चिरडून गेलेली नाहीं. तो जनानी-पणाच मला मुळीं आवडत नाहीं. तरी देखील ही हकिकत कळली—नि असं वाटलं,—( कृपेच्या गळयांत हात टाकून ) ऐकलंस ? कांहीं ऐकलं नाहीं मी. कांहीं कळलं नाहीं मला—समजलीस ? मला कांहीं कळलं नाहीं अगदीं. काल जशी मी होतें तशीच आज आहें असंच समज. ( एकदम निघून जाते. )

**खंडेरावः**—( आपल्याशींच ) मोठी विचित्र मुलगी आहे !

**कृपाः**—( दचकून उठून ) काय म्हटलंत ?

**खंडेरावः**—कांहीं म्हटलं नाहीं मी. नाटकांतल्या पात्रासारखं तें स्वगत भाषण मोठ्यानं बोलून गेलों ! ( कृपा एकदम रडूं लागते ) आतां कशाला रडतेस ? केवढा अविचार केलास हा ! तसं कां बोललीस हिच्यासमोर ? कुणालाच कांहीं कळलं नसतं. काय वाटेल तिला आतां ? नि आतां बोलली ती आपल्या बापाकडे—

**कृपाः**—नाहीं. ती बोलणार नाहीं. तिला तुम्ही ओळखलं नाहीं अजून. मोठी मर्द मुलगी आहे ती. तिच्या आधारावर तर मी जगलेंय अजून. इतरांसारखी असती ती, तर वेड लागलं असतं मला.

**खंडेरावः**—वेड लागलं असतं ! कां वेड लागलं असतं ? सावत्रपणांत छळ होतो तो मुलीचा —आईचा नव्हे. मुलांचा छळ करतात त्या त्यांच्या सावत्र आया. मुलं छळीत नाहींत आपल्या सावत्र आईला. यांत चांगुलपणा असला तर तो तुझा आहे—तिचा नव्हे. कसं सहन करतेस हें ? कां दुर्बुद्धि झाली ही तुला ? कां ही अशी स्वतःची हत्त्या करून घेतलीस ? ( क्षणभर स्तब्धता ) नि माझी ही अशी हत्त्या केलीस ? आज भेकड होऊन बसलोंय मी—साऱ्यांच्या थट्टेचा विषय झालोंय मी—

**कृपाः**—पुरे करा—पुरे करा—पुरे करा म्हणतें ना मी ! कां असा छळ करतां माझा ? आतां जा पाहूं इथून. क्षणभर मला स्वस्थ राहूं द्या. जरा मन सावरून घेऊं द्या. ( ताड्कन उठून ओरडून ) गेलांत नाहीं अजून ?

**खंडेरावः**—जी—( असें म्हणून शांतपणें पावलें टाकीत निघून जातो.

तो निघून जात असतांना ती सारखी त्याच्याकडे पहात असते. तो गेला असें पाहून कोचावर बसते आणि आपल्याशींच गुणगुणत एक चीज म्हणूं लागते. ती गात असतांना कॅप्टन शंकरराव प्रवेश करतो. ती गात आहे असें पाहून तो कांहीं वेळ ऐकत मागेंच उभा रहातो. किल्ली संपलेल्या ग्रामोफोन-प्रमाणें तिचें गाणें हळूहळू संपत येतें. )

**शंकरराव:**—वा: ! छान !

( कृपा दचकून एकदम उठून उभी रहाते. )

**कृपा:**—कोण ? तुम्हीं ! एकटेच आलांत ? चंदा नाहीं भेटली तुम्हांला ?

**शंकरराव:**—भेटली. मी थांबवायचा प्रयत्न केला तिला—पण ती आपल्याच नादांत होती. तशीच बागेंत निघून गेली.

**कृपा:**—( हंसण्याचा प्रयत्न करीत ) असं असतं हें. एकटी भेट झाली कीं उपवर मुली अशाच लाजतात.

**शंकरराव:**—लाजतात ? मला नाहीं वाटत ती लाजणाऱ्यांतली आहे म्हणून. मघाशीं आम्हीं दोघं एकटींच होतों ना इथं—पण त्यावेळीं कुणी लाजलं असेल तर तो मीच. मलाच संकोच वाटत होता तिच्याबरोबर बोलायचा. पण तिच्या बोलण्याचे सारखे फुटाणे उडत होते. ती जेव्हां अगदीं उघड उघड सरळ सरळ म्हणाली— ( थांबतो )

**कृपा:**—काय म्हणाली ?

**शंकरराव:**—शरम वाटते मला सांगायला—तिला त्याचं कांहींच वाटलं नाहीं म्हणा—पण ती अगदीं सरळ म्हणाली—( पुन्हां थांबतो )

**कृपा:**—असं एवढं ती म्हणाली तरी काय ?

**शंकरराव:**—ती म्हणाली—( मुरकून ) 'माझ्यावर प्रेम करा' असं अगदीं सरळ सरळ म्हणाली. ( कृपा हंसते ) हंसतां तुम्हीं ? राग नाहीं आला तुम्हांला ?

**कृपा:**—राग ? राग येण्याजोगं काय आहे यांत ? मला आपली जुनी आठवण झाली—मला तरी असं म्हणायचं धैर्य झालं असतं ? मनांत येत होतं पण उघड बोलायला धीर होत नव्हता—शब्द फुटत नव्हता तोंडावाटे—

**शंकरराव:**—केव्हां ?

कृपा :—( सुस्कारा सोडून ) त्या झाल्या गेल्या गोष्टी काय करायच्या आतां ? माणसाच्या आयुष्यांत अशा कांहीं अचुक चुका होतात कीं त्यामुळं त्याचं सारं जीवन बदलून जातं एकदम. म्हणूनच मला कौतुक वाटतं चंदेचं. ( आपल्याशींच ) तसं मला तरी सांगतां आलं असतं !

शंकरराव :—तुमचा गैरसमज होतोय. तसं कांहीं नव्हतंच मुळीं त्यांत. अगदीं भसाडेपणा होता तो तिचा—

कृपा :—छे ! नाहीं !

शंकरराव :—नाहीं नाहीं, तों अगदीं निव्वळ धसमुसळेपणा होता. या महाराष्ट्रांत तरी तिला नवरा मिळेल असं नाहीं वाटत मला. एकदां वायव्य-सरहद्दीवर तिला पाठवून बघा. तिथलाच कुणी तरी जिवावर उदार झाला तर.

कृपा :—अगदीं गैरसमज होतोय तुमचा. तुम्हीं कांटे पहातां फणसाचे—

शंकरराव :—फणस नव्हे, खाजकुइली आहे ही !—

कृपा :—कांहीं तरी गैरसमज झालाय तुमचा. तशी ती भारी प्रेमळ आहे—

शंकरराव :—वाघिणीचं प्रेम ना ? होय !

कृपा :—छे हो, तुम्हीं अगदीं वरवर पहातांहां. खरोखरच मोठी प्रेमळ आहे ती. माझा अनुभव आहे हा. मी तिची सावत्र आई—पण एखाद्या बहिणी-सारखी वागते ती माझ्याबरोबर—

शंकरराव :—हा तुमचा चांगुलपणा आहे. काय आश्चर्य आहे ! काय विलक्षण आहेत हे योगायोग ! ताडून पाहूं लागलों कीं वाटतं—( थांबतो )

कृपा :—काय वाटतं ?

शंकरराव :—नाहीं ! मी ताडून पाहूं लागलों, हें असं कसं ? वठलेल्या वडाला जाईच्या वेलीचा हा विळखा पडला कसा ?

कृपा :—काय म्हणतां ?

शंकरराव :—नाहीं !—तें तसं कां आणि हें असं कां ? कां हा असा योग जमून आला ? तसं पाहिलं तर तुम्हीं कांहीं अगदींच 'शारदा' नव्हे. चांगल्या शिकल्यासवरलेल्या. एक नांवाजलेल्या कवयित्री. कविहृदयाचा बाण हा भलत्या जागीं लागला कसा ?

कृपा :—असं पहा कॅप्टन, आपण चंदेच्या लग्नाबद्दल बोलतों आहोंत. अजून लग्न व्हायचंय तें तिचं. तुमच्याशीं तिचं लग्न व्हावं अशी सरकारसाहेबांची

इच्छा—मलाही तें पटलं—म्हटलं तिलादेखील फौजी माणसाची आवड आहे—

**शंकरराव**:—फौजी माणूस जिवावर उदार झालेला असतो खरा बाईसाहेब, पण तो रणांगणावर! रोज घरीं रणांगण माजावं असं कुठल्या फौजी-माणसाला वाटत असेल, असं निदान मला तरी वाटत नाहीं. स्पष्ट बोलतों म्हणून राग मानूं नका, अहो ही काय मुलगी? ब्रिगेडीअर जनरल आहे हा. फौजी हुकूम पाळतां पाळतां थकलेल्या जिवानं घरीं यावं अन् तिथं सुद्धां सवाल टाकायला घरीं असा एकादा लेफ्टनंट कर्नल मिळावा, असं माणसाच्या जातींतल्या कोणत्या जिवाला वाटेल? (चंदा येऊन मागें दारांत उभी रहाते) करड्या साहेबांचे करडे हुकूम तामिल करतांना बेजार झालेल्या जिवानं घरीं यावं—तर तिथं हा जहरी नागिणीचा विळखा! बाईसाहेब, तुम्हांला माहित नाहीं, जो दुसऱ्याचे हुकूम पाळतो त्यालाच वाटत असतं कीं आपल्या हाताखालीं कुणीतरी हुकूम पाळणारं माणूस पाहिजे.

**चंदा**:—(पुढें येऊन) कां? वर मिळालेल्या लाथा खालीं पोंचवायला? हें लक्षण फौजी नव्हे. हें कारकुनाचं लक्षण आहे—

**कृपा**:—आतां जरा उगी रहाशील चंदा?

**चंदा**:—केव्हांपासून आडून ऐकतेंय—मेले सगळे सारखेच! जें मिळेल तें टाकायचं नि अशक्याच्या पाठीमागं लागायचं. तुझी दया येत होती ना ग यांना? (शंकररावाला) कां हो, हिची दया येत होती नव्हे तुम्हांला?

**शंकरराव**:—दया येत होती असं कुणी म्हटलं?

**चंदा**:—वठलेला वृक्ष नि जाईची वेल असं जें कांहीं काव्य चाललं होतं तुमचं—

**शंकरराव**:—काव्यच तें! त्याला कांहीं अर्थ नसतो.

**चंदा**:—असं का? निरर्थक बडबड होती तर ती तुमची? नि माझ्याबरोबर बोलत होतां ती देखील अशीच बडबड का?

**शंकरराव**:—कुठं बोलत होतों? ऐकायचंच काम केलं मी बरंचसं.

**कृपा**:—(चंदेला) मला जरा बोलूं दे. (शंकररावाला) आणखी किती दिवस रहाणार आहांत इथं?

**शंकरराव**:—ऑक्टोबर अखेर गेलंच पाहिजे मला. आसामच्या सरहद्दीवर हजर झालं पाहिजे.

कृपाः—म्हणजे आतां मुळींच अवधि राहिला नाहीं तर ? सरसाहेबांना काय उत्तर देणार आहांत ?

शंकररावः—कशाबद्दल ?

कृपाः—लग्नाबद्दल हिच्या.

शंकररावः—मला विचार केला पाहिजे—

चंदाः—खरं आहे तें. अविचारानं होकार दिल्याची फळं पाहिलीं आहेत मी. ( कृपा तिच्यावर डोळे वटारते ) मागनं पश्चाताप होणं कांहीं बरं नव्हे.

शंकररावः—अगदीं बरोबर. पश्चाताप होईल असं कांहीं करणं केव्हांच बरं नव्हे.

चंदाः—माझ्याबरोबर लग्न केलं तर पश्चाताप होईल असं वाटतं का तुम्हांला ?

शंकररावः—तें कांहीं निश्चित सांगतां यायचं नाहीं आज. त्यांतून हें आमचं शिपायाचं जिणं — लढाई प्रत्यक्ष सुरू झालेली—पुढं काय होईल याची निश्चिती नाहीं—मला वाटतं लढाईवरून परत आल्यावरच—

चंदाः—परत आलांत तर ?

शंकररावः—हो परत आलों तर. म्हणूनच म्हणतों कीं एव्हां कांहीं निश्चित ठरवूं नये.

कृपाः—पण जायच्यापूर्वींच तुम्हीं लग्न करून जावं असा इरादा दिसतो सरसाहेबांचा.

चंदाः—पेन्शनची लालूच दिसते ही. स्वतःला पेन्शन मिळतंय त्यांत आणखी माझ्या पेन्शनची भर हवी आहे वाटतं त्यांना ?

कृपाः—काय बोलतेस हें चंदे ? असं अभद्र बोलायला कांहींच कसं वाटत नाहीं तुला ? लढाईवर जाणारं माणूस, तिथं कांहीं तरी शुभेच्छा बोलावी—

शंकरराव—म्हणूनच म्हणतों, कीं लढाईवरून परत आल्यावरच आपण या गोष्टीचा विचार करूं.

चंदा—अन् मी लढाईवर गेलें तर ? ( शंकरराव हंसतो ) हसूं नका. काय वाटेल तें करून लढाईवर जायचं असा निश्चयच केलाय मी. ( सर सोमनाथ आणि त्यांच्याबरोबर दिनकर, दिवाकर, सदानंद, ब्रह्मानंद आणि पुष्पा प्रवेश करतात. )

सर सोमनाथः—या मंडळी ! हे पाहिलेत, हेच ते कॅप्टन गोखले. ब्रह्म-

देशच्या लढाईवरून आलेयत बरं हे ! बसा मंडळी, बसा,—मोठी विलक्षण मर्दुमकी दाखवली तिथं यांनीं.

**दिवाकरः**—असं का ? काय तिकडे झालं तें सांगा पाहूं कॅप्टनसाहेब ?

**दिनकरः**—हो, हें एक बरं झालं. वर्तमानपत्रं एक सांगतात, लोक भलतंच बोलतात,—शिवाय तो रेडिओ आहेच. अशा वेळीं फर्स्ट हँड बातमी मिळणार हें आपलं भाग्यच म्हणायचं.

**शंकररावः**—असं तर खरंच—पण मला आपली निराशा करावी लागणार आहे. हीं फौजी रहस्यं आहेत, लढाई संपेपर्यंत यातलं कांहींच कुणाला सांगतां यायचं नाहीं.

**ब्रह्मानंदः**—हुकूम आहे वाटतं तसा ?

**शंकररावः**—तेंही सांगतां यायचं नाहीं.

**दिवाकर**—केव्हां आलांत तुम्हीं लढाईवरून ?

**सदानंदः**—पण लढाईवरूनच आलांत ना ?

**चंद्राः**—पहा कीं त्यांच्याकडे.

**पुष्पाः**—आतां काय म्हणावं या माणसांना ? फौजी पोषाखांत आलेले एवढं सुद्धां दिसत नाहीं यांना ?

**चंद्राः**—कारकून आहेत झालं !

**दिवाकरः**—नाहीं बरं, मी तरी कारकून नाहीं. मी संपादक आहें—सहसंपादक आहें तें माहित आहे ना तुम्हांला ?

**चंद्राः**—म्हणजे कारकूनच.

**सर सोमनाथः**—त्यांना बोलूं तरी देशील चंदे ? तुम्हां लोकांना मी सांगतोंय तें हें, यांच्याकडे पहा—अन् मग तुम्हीं स्वतःकडे पहा. यांचं कौतुक नाहीं वाटत तुम्हांला ?

**दिवाकरः**—कोण म्हणतो कौतुक वाटत नाहीं म्हणून ?

**सर सोम०ः**—होय ना ? मग यांच्यासारखं व्हावं असं नाहीं वाटत तुम्हांला ?

**दिवाकरः**—अलबत वाटतं ! पण सारेच जर लढाईवर जाऊं लागले तर यांचं कौतुक कोण करील ?

**सर सोम०ः**—आम्हीं आहोंत कीं म्हातारे लोक तुमचं कौतुक करायला.

जाऊं म्हटलं तरी कुणी आम्हांला लढाईवर पाठवीत नाहींत. अन् तुम्ही लोक हे असे खुर्ची कवटाळून बसलां आहांत. यांना पाहून देखील स्फूर्ति येत नाहीं तुम्हांला ?

**दिनकर**:—स्फूर्ति आली असती सर साहेब, पण हीं वर्तमानपत्रं मोठीं घात करताहेत—भलभलत्या बातम्या छापताहेत—हेऽ मोठे भोपळ्या एवढ्या अक्षराचे मथळे देताहेत ते पहातों ना आम्हीं रोज ?

**सर सोम०**:—मी सुद्धां पहातोंय. ते मथळे पहातों आहें म्हणूनच मला मोठा चेव येतोय. ( खंडेराव घाईघाईनें येतो ) काय आहे ?

**खंडेराव**:—बंगालच्या गव्हर्नरसाहेबांना पाठवायचं हें पत्र अर्धंच राहिलंय–

**सर सोम०**:—अरे हो खरंच. माफ करा अं मंडळी, हें एवढं काम पुरं करून येतों. तों पर्यंत चालूं द्या तुमच्या गोष्टी. मी आल्याशिवाय जायचं नाहीं बरं कॅप्टन—( खंडेराव आणि सर सोमनाथ जातात )

**पुष्पा**—बरं झालं. गेले एकदांचे. दूर कां बसली आहेस कृपाताई ? अशी ये ना इकडे. पुरे झाल्या त्या लढाईच्या गोष्टी. या म्हाताऱ्या माणसांचं असंच ! त्यांना आवडतं तेंच आम्हाला आवडलं पाहिजे म्हणतात. आमच्या वयाकडे पहात नाहींत. एवढं आयुष्य आहे आमच्यापुढं—

**कृपा**:—हो. असं यापूर्वी वाटत होतं आपल्याला. ही लढाई सुरू झाली, आतां अगदीं आपल्या दाराशीं आली, तेव्हां दृष्टि एकदम बदलूं लागली. तारुण्य संपलं असं वाटूं लागलं. आतां—

**चंदा**:—तुला वाटायचंच.

**दिवाकर**:—कविहृदय आहे हें. किती सुंदर कविता आली होती ती तुमची ' संग्राम ' मधें ! मला तर असं वाटलं, लढाईच्या मैदानावर प्रत्यक्ष पाहून येऊनच तुम्ही ती कविता लिहिली—

**दिनकर**—कुठली कविता ?

**दिवाकर**:—वाचली नाहींस तूं ?

**ब्रह्मानंद**:—मी वाचली.

**सदानंद**:—सुंदर ! फारच सुंदर. मोठी स्फूर्तिजनक आहे ती कविता.

**दिवाकर**:—कृपाताई, अशा इथं बसा मधें.

**दिनकर**:—अरे सरसाहेब ऐकतील ! कृपाताई काय म्हणतोस ?

**दिवाकर**:—हें पहा, आम्हीं कांहीं अगदींच खंडोबा नाहीं. तें कॉलेजांतलं नाटक कांहीं आपल्याला विसरायला होत नाहीं. तो खंड्या आतां आला पण ढुंकूनसुद्धां पाहिलं नाहीं बेट्यानं.—या, इथं बसा—त्यावेळीं सारख्या भिंगऱ्या घालीत असे यांच्यासभोंवार—बरं का कॅप्टनसाहेब, आम्ही हें सारे बरोबरचे स्टुडंण्ट्स् आहोंत. असे येतों मधून मधून जुन्या आठवणी जागवायला—

**चंदा**:—अन् मग आईला वाटतं, कीं आपण अगदीं कॉलेजांतच आहें—होय ना आई?

**पुष्पा**:—अग यांच्यासमोर तरी आई म्हणूं नकोस तिला.

**दिवाकर**:—नांवात काय आहे?—व्हॉट्स् इन अ नेम?—शॉनं म्हटलं आहे ना रे असं?

**ब्रह्मानंद**:—शॉ नव्हे, शेक्सपिअर.

**दिवाकर**—शॉ काय शेक्सपिअर काय, एकच! कुणातरी नाटककारानं म्हटलं आहे एवढं खरं—( कृपेला ) तें कांहीं नाहीं, तुम्हीं इथं मधें बसलं पाहिजे. अशा तुम्हीं मधें चंद्रिकेसारख्या आणि आम्ही सारे सभोवार—

**चंदा**:—धूमकेतूसारखे.

**दिवाकर**:—गुरु, शुक्र, मंगळ, व्याध—

**चंदा**:—शनि, राहू, केतू—अन् मी कोण दिवाकरपंत?

**दिवाकर**:—तूं होय? तूं रेवती—न दिसणारी तारका—निःशर योग-तारा!

**चंदा**:—पण टिळक पंचांग निघालंय तें रेवतीच्याच सुरवातीनं ना?

**दिवाकर**:—थांब ग—

**पुष्पा**:—आणि मी कोण!

**दिवाकर**:—तूं होय? मघा—धो धो पावसाचं नक्षत्र—

**चंदा**:—अन् हे कॅप्टनसाहेब?

**दिवाकर**:—यांना धूमकेतू म्हटलंस तर तें सहज शोभून जाईल. आज उगवले आहेत, उद्यां मावळणार आहेत. एकदम चमकताहेत धूमकेतू-सारखेच. कदाचित तसेच एकदम गडपसुद्धां होतील.

**चंदा**:—असा हा सारा आकाशी थाट जमलाय म्हणायचा. पण या चंद्रिका न् तारका दिसायला काळोख हवा ना पुरेसा!

**दिवाकरः**—तोही आहे. ही लढाईची काळोखी आली आहे ना आपल्यावर !

**दिनकरः**—अन् त्यांतून चमकणाऱ्या या चांदण्या.

**दिवाकरः**—पण दिन्या, तूं नकोस इथं. या असल्या काळोखांत दिनकराचा प्रकाश नको.

**पुष्पाः**—तुम्हीं जा हो लढाईवर दिनकर. तिकडे पडूं दे तुमचा प्रकाश.

**ब्रह्मानंदः**—आतां खामोष. सायलेन्स—क्वाएट!—हं. आतां होऊं द्या तें काव्य सुरू.

**कृपाः**—असलं मर्दानी गाणं माझ्या तोंडीं नाहीं शोभायचं. मी तें लिहिलंय खरं,—पूर्वी नसतं तें साधलं—पण आतां या रोज फौजी गोष्टी ऐकतें, त्याचा परिणाम झालाय. लिहिलंय खरं, पण माझं तेवढंसं समाधान झालं नाहीं. कुठंतरी कांहीतरी चुकलंयसं वाटतं. मी म्हणण्यापेक्षां—मला वाटतं दिवाकर, तुम्हीच दाखवा ना म्हणून.

**सर्वः**—हं दिवाकर, होऊं दे सुरू.

[ दिवाकर खांकरून खोकरून पहिल्यानें सूर धरतो आणि नंतर शक्य तितक्या ढंगेल लकबीनें ‘ दोस्त हो चला लढाईवर ’ हें पद म्हणतो. तें संपत असतांना सारे टाळ्या देतात. एकटी चंदा मात्र मोठमोठ्यानें खोखो करून हंसते. ]

**पुष्पाः**—हें काय चंदा, हंसतेस काय ? किती सुंदर म्हटलं पद यांनीं ! परवां कृपाताईला सुद्धां इतकं चांगलं म्हणतां आलं नव्हतं.

**चंदाः**—इतकं चांगलं ? हें चांगलं ? काय छक्कड आहे ती तमाशांतली ! मुरके कशाला मारीत होते पद म्हणतांना ? ‘ चला लढाईवर ’ म्हणून सांगतांना, म्हणणाऱ्यानं डोळा मारला पाहिजे वाटतं दुसऱ्यावर !—खरंच दिवाकरपंत, पद मोठं सुंदर म्हटलंत, पण एक उणीव होती. असलीं पदं सुटाबुटांत म्हटलेलीं शोभत नाहींत. लुगडं हवं होतं. माझं चोळी पातळ देऊं आणून ?

**कृपाः**—हें बरं नव्हे हं चंदा. बोलतांना कांहीं माणूस पाहून बोलावं.

**चंदाः**—तेंच होतं माझ्या मनांत, पण दिसेनाच कुणी माणूस इथं.

**दिवाकरः**—असं पहा चंदाताई, मला मुळींच राग आला नाहीं बरं तुमच्या बोलण्याचा ! लुगडं नेसण्यासाठीं पूर्वी आम्हीं भांडलों आहोंत.

कॉलेजांत असतांना पहिल्यानं जेव्हां गॅदरींगच्या नाटकांत लेडीज् काम करूं लागल्या तेव्हां आम्हीं भांडून दुसरं नाटक केलं स्त्रीपार्ट करण्यासाठीं—

**कृपाः**—आपली फजिती आपणच तरी सांगू नका.

**दिवाकरः**—कां सांगू नका ? सारखीं तीन वर्षं मी स्त्रीपार्ट करीत होतों गॅदरिंगच्या वेळीं—

**चंद्राः**—अगदीं पुरेपुर पटतंय हें मला.

**दिवाकरः**—थट्टा करूं नका. मोठा अभिमान आहे मला त्या गोष्टीचा.

**चंद्राः**—म्हणूनच तें पद तसं म्हटलंत ?

**ब्रह्मानंदः**—मग कसं म्हणायचं ?

**सदानंदः**—हो, हो ! हें अगदीं बरोबर ! असं म्हणायचं नाहीं तर कसं म्हणायचं याचं ' प्रात्यक्षिक ' करून दाखवलं पाहिजे.

**दिनकरः**—कुणी ?

**सदानंदः**—अर्थात ज्यांनीं हें नांव ठेवलं असेल त्यांनीं.

**चंद्राः**—मग भीतें कीं काय ?

**दिवाकरः**—तर मग दाखवा ना तें प्रात्यक्षिक.

**चंद्राः**—ऐका. ( असें म्हणून ती तेंच पद आपल्या विशिष्ट पद्धतीनें म्हणून दाखवते. कॅप्टन शंकरराव तेवढा टाळ्या देतो. )

**कृपाः**—छान !

**पुष्पाः**—काय छान ? कसं ढंगेल म्हटलं होतं दिवाकरपंतांनीं ! हें काय गाणं ? बॅन्ड वाजवायला हवा होता—

**चंद्राः**—हो ! बॅन्डच वाजवायला हवा होता—या असल्या चालीपेक्षां एकादा पोवाडा असता तर जास्त जोर आला असता पण आईच्या डोक्यांत ती ' एकलेपणाची आग ' घुसलीय ना ?

**दिवाकरः**—आतां कसली आली आहे एकलेपणाची आग ?

**शंकररावः**—जाऊं द्या हो ! हीं अशीं कांहींतरी पदं तयार झालींच पाहिजेत. तिकडे आमचे ते ब्रिटीश आणि अमेरिकन शिपाई जेव्हां तीं आपापलीं पदं म्हणूं लागतात तेव्हां आम्हांला मान खालीं घालावी लागते. पंजाब नि उत्तर हिंदुस्थानच्या पलटणी देखील आपलीं हिंदी पदं म्हणत असतात. आम्ही मराठे तेवढे—

**चंदा:**—नुसते त्यांचीं पदं ऐकत बसतों—असंच ना ? अन् हे मराठे म्हणे जवाँमर्द, राज्यं केलीं होतीं यांनीं एका काळीं. आतां कारकुनी करताहेत बेटे.

**दिवाकर:**—असं म्हणूं नकोस चंदाताई. लढाईचे डावपेंच जितके आम्हांला कळतात तितके दुसऱ्या कुणाला कळत नाहींत. आमच्या दैनिकां-तला तो दर आठवड्याचा लढाईचा आढावा वाचतेस ना? कसे अचुक अंदाज असतात त्यांत !

**पुष्पा:**—तुम्हींच लिहितां वाटतं तें ? ( दिवाकर अर्थपूर्ण हंसतो ) सरसाहेब देखील तारीफ करतात त्या लेखांची.

**दिवाकर:**—आतां हेंच पहा— कसं पहिल्यापासून चुकत आलंय लढाईचं धोरण. चेंबर्लेननं म्युनिक पॅक्ट केलं तीच पहिली चूक झाली—

**ब्रह्मानंद:**—वा वा ! कुणी म्हणतात तेंच अगदीं बरोबर केलं होतं त्यांनीं !

**दिवाकर:**—हें मुर्खांनीं म्हणावं. चर्चिलसाहेब होते म्हणून इंग्लंडची अब्रू बचावली. छत्रीपेक्षां चिरूटाचं महत्त्व जास्त आहे हें सिद्ध झालं. चेंबर्लेननं छत्री झांकली आणि चार्चिलसाहेबांनीं चिरूट शिलगावला तेव्हां कुठं लढा-ईला जोर आला. आतां हा ब्रह्मदेश गेला खरा,—

**दिनकर:**—ब्रह्मदेश नव्हताच हिंदुस्थानांत !

**दिवाकर:**—तें खरं रे. पण आतांच्या या ज्या हालचाली सुरू आहेत त्यांचं खरं महत्त्व आहे तें तिकडे. कॉकेशसच्या सरहद्दीवर आतां ही थंडी पडूं दे म्हणजे स्टॅलिनचं सैन्य जर्मनांची कशी भंबेरी उडवते तें दिसून येईल. तुम्हाला काय वाटतं कृपाताई ?

**कृपा:**—सरसाहेब देखील असंच म्हणतात. जर्मनीला पहिला धक्का बसणार आहे तो रशियांतूनच. कुणीं सांगावं, उद्यां जपानसुद्धां सैबेरियांतून रशिया-वर चाल करून जाईल. अन् मग हिंदुस्थानकडे वळायला त्याला जोर रहायचा नाहीं.

**ब्रह्मानंद:**—तिकडून चँग-कै-शेक तडकावतोच आहे जपानला. ऑस्ट्रे-लियानं दाणादाण उडवायला सुरवात केली आहे जपानची—

**दिवाकर:**—खरं आहे तें. या तिन्ही बाजूचा जोर लागला कीं या जपानी टिनपॉटचा खुर्दा उडेल कीं !

**सदानंद**:—माझा मोठा विश्वास आहे या चँग-कै-शेकवर. पांच वर्षं सारखा जपानशीं लढत राहिलाय बेटा.

**चंदा**:—हें झालं तिकडचं. पण आमच्या हिंदुस्थानचं काय ?

**दिवाकर**:—काय वेडा प्रश्न हा ! इथं केवढी जय्यत तयारी सुरू आहे ती पहाते आहेस ना ? अमेरिकेतून सैन्य आलंय, ऑस्ट्रेलियांतून सैन्य आलंय, चिनी आलेयत, पोलंडचेसुद्धां शिपाई हिंदुस्थानच्या संरक्षणासाठीं सरसावले-यत पुढें—

**चंदा**:—आणि आम्हीं ?

**दिवाकर**:—आम्हीं आहोंतच कीं ! तशी वेळ येईल तेव्हां आम्हीं सुद्धां लेखणी ठेवून बंदूक घेऊं कीं हातीं !

**कृपा**:—या कॅप्टनसाहेबांकडे पहा ना चंदे.

**चंदा**:—पण असे किती आहेत ? खंडींत पावरती. अजून आम्हांला मोह सुटत नाहीं कारकुनीचा.

**ब्रह्मानंद**:—ए. आर. पींत आहोंत कीं आम्हीं.

**चंदा**:—आणि पलटणींत ?

**ब्रह्मानंद**:—पलटणींत जाऊं वेळ येईल तेव्हां.

**चंदा**:—केव्हां येणार ही वेळ ?

**दिवाकर**—तें आज कुणालाच सांगतां यायचं नाहीं. ( चंदा हंसते ) हसूं नकोस. आज आम्हीं नुसतं निरीक्षण करतों आहों. सारखे वॉच करतों आहों ही लढाई. प्रसंग येईल तेव्हां पाहाशील. हे अस्से सरळ तोफांच्या धुमधडाक्यांत रणांगणावर उडी घेऊं.

**चंदा**:—खरंच ? ( असें म्हणत ती हळूच टेबलाजवळ जाते आणि सर्वांच्या नकळत ड्रॉवर उघडून पिस्तूल काढून घेते. )

**दिवाकर**:—मराठ्यांचे बच्चे आहोंत आम्हीं. लेख वाच आमचे. त्या नुसत्या लेखांनींसुद्धां वीरश्री संचारेल अंगांत. काय लढाईची आम्हांला कल्पना नाहीं ? काय विमानं आम्हीं पाहिलीं नाहींत ? काय तोफांचे आवाज आमच्या वाडवडिलांनीं कधीं ऐकले नव्हते ? ( चंदा हंसते ) हसूं नकोस चंदाताई. शिवाजी, प्रतापसारख्या लढवय्यांचे, दुराणीचं नरडं फोडणाऱ्या राघोभरारीचे वंशज आहोंत आम्हीं. तें लढवय्याचं रक्त आमच्या नसांनसां-

तून सळसळतं आहे. ती आमची वीरश्री त्यावेळींच जगाला दिसून येईल, कीं ज्यावेळीं या भारतवर्षाच्या पितृभूमीवर तोफांचे आवाज—

[ चंदा हातांतल्या पिस्तुलांतल्या गोळ्या वर झाडते. कॅप्टन गोखलेखेरीज सर्वांची दाणादाण उडते. एकेकजण घाबरून कुठें ना कुठें तरी लपायचा प्रयत्न करतो. सर सोमनाथ आणि खंडेराव धांवत येतात. ]

**सर सोम०:**—काय झालं ?

**खंडेराव:**—( थरथर कांपत ) बॉंब पडले कीं काय ?

**चंदा:**—( हातांतलें पिस्तूल टेबलावर फेंकून ) ही वीरश्री पहा आमच्या बोलघेवड्या वीरांची. केवढ्या लंब्याचौड्या बाता झोंकीत होते, पण नुसत्या पिस्तुलाचे आवाज ऐकतांच दाणादाण उडाली एकेकाची.

**सर सोम:०**—हेंच—हेंच तें ! एवढासा आवाजसुद्धां आमच्या संवयीचा नाहीं. कसं होणार हें ? केव्हां उघडणार आमचे डोळे ?

**दिवाकर:**—( हळूच पुढें येऊन ) तें आम्हीं ढोंग केलं बरं सरसाहेब. नुसतं चंदाताईला चिडवण्यासाठीं. काय एवढ्याशा पिस्तुलाला भीतों आम्ही ?

**तिघे:**—हो हो तर !

**चंदा:**—भीत नाहीं ना ? मग या ना असे पुढं. हे कॅप्टनसाहेब इथं आहेत. लवकरच हे लढाईवर जाणार आहेत. तुम्हीं जातां यांच्याबरोबर ?

**सर सोम:०**—हो ! तुम्हीं जातां यांच्या बरोबर ? मी माझं वजन खर्चं करून तुम्हांला कमिशन देववतों.

**दिवाकर:**—काय रे दिनकर, जातोस ?

**दिनकर:**—काय रे ब्रह्मानंद ? अन् तूं रे सदानंद ?

**ब्रह्मानंद:**—तुम्हीं बोला ना आपल्यापुरतं. आमचीं कशाला नांवं घेतां ?

**सर सोम०:**—बोला. या क्षणाला सांगा काय तें ? असं सळसळून येतंय मला—पण मला कुणी जाऊं देत नाहीं. मी गेलों नाहीं तरी माझीं चार माणसं गेलीं असं मला म्हणतां आलं, तरीसुद्धां मला आनंद होईल.

**दिवाकर:**—अविचारानं का एकदम हो म्हणतां येतं ? कोणतीही गोष्ट विचार करूनच केली पाहिजे. कसं दिनकर ?

**दिनकर:**—अर्थात् !

**सर सोम०:**—मला या क्षणाला उत्तर पाहिजे आहे तुमचं.

**दिवाकरः**—थोडा अवधि द्या आम्हांला. विचार केला पाहिजे—विचारलं पाहिजे—मागली कांहीं व्यवस्था करून ठेवली पाहिजे—असंच कीं नाहीं ब्रह्मानंद ? ( तिघेही होकार देतात ) हं. बरं तर कृपाताई, नाहीं लेडी सोमनाथ, येतों आम्हीं. नमस्कार कॅप्टनसाहेब, नमस्कार सरसाहेब—( एक-मेकांना ओढीत चौघेही निघून जातात )

**शंकररावः**—हें असं पाहिलं कीं माझा मलाच अभिमान वाटूं लागतो.

**सर सोमनाथः**—तुम्हांलाच कां ? मला सुद्धां मोठा अभिमान वाटतो तुमचा. नाहींतर हा आमचा खंडेराव—

**खंडेरावः**—जी.

**सर सोमनाथः**— तुम्हांला बोलावलं नाहीं मी. ( शंकररावाला ) सारे एका माळेचे मणी.

**चंदाः**—नुसते बोलघेवडे आहेत एकेक. लढाईच्या गप्पा मारीत होते. नुसतीं नावं घेत होते एकेकांचीं—आढावा काढीत होते लढाईचा—हं:—नि हे म्हणे मर्द—

**सर सोमनाथः**—असं म्हणूं नकोस चंदे. या कॅप्टनसाहेबांना विसरतेस.

**कृपाः**—ती कशी विसरेल कॅप्टनसाहेबांना ?

**सर सोमनाथः**—होय ? म्हणजे ठरलं ?

**पुष्पाः**—खरंच ? खरंच ठरलं यांचं लग्न ?

**चंदाः**—लढाईच्यावेळीं लग्नाच्या गोष्टी कशाला ? आतां लग्न लागायचं तोफेच्या गोळ्यांशीं. पुरुषाचं काय कीं स्त्रीचं काय, आतां लग्न लागणार आहे तें लढाईच्या मैदानावर—

[ ‘ उभ्या जगाला आग लागली ’ हें पद म्हणायला ती सुरवात करीत असतांना पडदा पडतो ]

—पडदा—

# अंक तिसरा

[ सर सोमनाथचा दिवाणखाना—खंडेराव आपल्या टेबलाजवळ लिहीत आहे—सर सोमनाथ येरझाऱ्या घालीत आहे, त्यावरून वाटतें कीं तो पत्राचा मजकूर सांगत असावा. पडदा वर जातो तेव्हां मजकूर सांगून पुरा झाला असावा. ]

**सर सोम०:**—झालं ? किती झालीं पत्रं ?

**खंडेराव:**—( चोपडीचीं पानें परतून ) सहा झालीं.

**सर सोम०:**—ठीक. आजच्यापुरतं तरी काम झालं म्हणायचं. आतां हीं पत्रं टाईप करून तयार ठेव. डाकेची वेळ होऊन गेली आहे, आतां सावकाश टाईप केलीं तरी हरकत नाहीं. ( एकदोन वेळ येरझाऱ्या घालून ) कसं अगदीं अस्वस्थ वाटतंय आज—मी माझ्या परीनं पुन्हां पुन्हां सूचना देतों आहें पण कुणी हिशेबांत घेताहेत कीं नाहीं तेंच कळत नाहीं मला. लिहिल्याशिवाय राहवत नाहीं म्हणून लिहितोंय—पण माझी थट्टा देखिल करीत असतील ! ( खंडेरावासमोर येऊन ) इकडे पहा—( खंडेराव दचकून 'जी' म्हणतो ) तुला काय वाटतं ?

**खंडेराव:**—अं ? कशाबद्दल ?

**सर सोम०:**—या आतां लिहिलेल्या पत्राबद्दल.

**खंडेराव:**—मला कांहीं कळत नाहीं त्यांत. आपण सांगतां मी लिहून घेतों—टाईप करतों न् पाठवून देतों.

**सर सोम०:**—म्हणजे मी काय लिहितों, कां लिहितों, याचा कधींच विचार करीत नाहींस ?

**खंडेराव:**—नाहीं. तें माझं काम नाहीं.

**सर सोम०:**—आतां काय म्हणावं या माणसाला ! हा टाईपरायटर आणि तूं या दोहोंत कांहीं फरक आहे एवढं तरी वाटतं का तुला ?

**खंडेराव:**—नाहीं. कां वाटावं ?—मी कारकून आहें—हुकमाचा ताबेदार आहें—आपण सांगाल तें काम करणं एवढीच माझी जबाबदारी. तेवढी बिनचुक पार पाडण्याची मी खबरदारी घेतों.—

**सर सोम०**:—हीं असलीं यंत्रं—निर्जीव माणसं—

**खंडेराव**:—शिपायासारखंच आहे आम्हां कारकुनांचं. हुकुम झाला कीं तो बजावायचा, कां म्हणून विचारायचं नाहीं. शिपाई कधीं विचारतो का तसं आपल्या वरिष्ठाला ? तो करतो का कांहीं विचार ?

**सर सोम०**:—खरं आहे तुझं म्हणणं, पण शिपाई आणि कारकुन यांच्या कामगिरींत फरक असतो. शिपायाला लढायचं असतं, कारकुनाला—

**खंडेराव**:—( पुटपुटत ) दडायचं असतं—रडायचं असतं.

**सर सोम०**:—काय म्हटलंस ?

**खंडेराव**:—नाहीं, म्हटलं शिपायाला लढायचं असतं.

**सर सोम०**:—हो, लढायचं असतं. पण आम्हीं लढाई विसरलों आहों. जुने इतिहास वाचतों आहों. पूर्वजांच्या पराक्रमाची शेखी मिरवतों आहों. आज तिकडे लढाई चालली आहे पण आम्हीं इथं काय करतों आहोंत ?

**खंडेराव**:—पत्रं लिहितों आहोंत.

**सर सोम०**:—गप्प बैस. लढाईसाठींच हीं पत्रं लिहितों आहोंत आपण. आजउद्यां त्यांतूनच कांहींतरी निघेल. शंभर सूचना दिल्या तर उद्यां त्यांतली एकादी तरी वर पटेल—अन् मग मला तेवढंच समाधान होईल—

**खंडेराव**:—जी.

**सर सोम०**:—बरोबर आहे. तीं पत्रं तयार करून ठेव. ते कॅप्टन आले नव्हते वाटतं ?—नाहीं ? आले कीं मला सांगायला ये. तोंपर्यंत मी लायब्ररींत बसलोंय—( बोलत बोलत निघून जातो )

[ सर सोमनाथ जात असतांना खंडेराव त्यांच्याकडे पहात असतो—तो गेल्यावर हातची चोपडी बाजूला ठेवून देतो—उठून दरवाजाजवळ जाऊन डोकावून पहातो—एकदम दचकून मागल्या पावलीं हटतो—चंदा येते ]

**चंदा**:—( कांहीं वेळ खंडेरावाकडे रोखून पाहून ) अस्सं !

**खंडेराव**:—( घाबरून ) काय ?

**चंदा**:—तुम्हीं नाटक कंपनींत होतां कधीं ?

**खंडेराव**:—छे ! मी ? नाटक कंपनींत ? छेः—नाहीं.

**चंदा**:—मग एवढा बेमालूम अभिनय कसा करतां येतो तुम्हांला ?

**खंडेराव**:—अभिनय !

चंदाः—हो हो, अभिनय. पूर्वी मला वाटे, कीं तुम्ही खरेच घाबरट आहांत—पण आतां वाटतं—( थांबते )

खंडेरावः—काय वाटतं ?

चंदाः—वाटतं, तुम्हीं अट्टल डांबिस आहांत !

खंडेरावः—मी ? काय केलं मी ?

चंदाः—तेंच तर मला कळत नाहीं. तुम्हीं कांहींतरी केलं पाहिजे होतं—म्हणूनच शंका येते मला—डांबिस असतां तर यापूर्वीच कांहींतरी हातचलाखी करून गेलां असतां—

खंडेरावः—म्हणजे मी डांबिस नाहीं तर ?

चंदाः—तेंच कळत नाहीं ना मला ! एकदां वाटतं, कीं तुम्हीं ढोंग करतां; पण पुन्हां वाटतं कीं तुमचा काबू नाहीं स्वतःवर.

खंडेरावः—तेंच बरोबर आहे.

चंदाः—( कोचावर बसत ) परवां आईनं सांगितलं तें खरं का ? ( स्तब्धता ) खरं का तें ? नका उत्तर देऊं वाटलं तर ! मी धरून चालतें, कीं तें खरं आहे. आतां काय करणार तुम्हीं ?

खंडेरावः—काय करणार ! काय आहे माझ्या हातीं ? नशिबाला दोष देत स्वस्थ बसलोंय.

चंदाः—असं का ? मी आंधळी आहें असं का वाटलं तुम्हांला ?

खंडेरावः—कां ? काय केलं मी ?

चंदाः—काय करतां आहां तें तुम्हांला माहित आहे, आईला माहित आहे, अन् मलाही माहित आहे. घाबरूं नका—मी दगा देणार नाहीं तुम्हांला.

[ एक मोठा सुस्कारा सोडून खंडेराव शेजारच्या खुर्चीवर बसतो ]

चंदाः—तर मग तुम्हीं खरेच भित्रट बनलां आहांत ! कां झालं हें असं ?

खंडेरावः—तें माहित आहे ना तुम्हांला ? भूकंप झाला कीं पर्वताच्या नद्या होतात—

चंदाः—हो. अन् समुद्रांतून बेटं वर येतात.

खंडेरावः—हो, पण मी समुद्र नव्हतों. मी पर्वत आहें असं मला वाटत होतं—पर्वत आहें असा अभिमान होता म्हणूनच तो भूकंप होतांच असा खचलों. दुभंग होऊन गेलों. म्हणूनच हा असा झालों—

**चंदाः**—असं बोलून कसं चालेल ? तुम्हीं मर्द आहांत—होय ना ?

**खंडेरावः**—तोच प्रश्न आहे मला.

**चंदाः**—मी सांगतें, तुम्हीं मर्द आहांत. मग कां मर्दासारखे वागत नाहीं तुम्हीं ?

**खंडेरावः**—म्हणजे ?

**चंदाः**—आतां काय सांगावं तुम्हांला ! यापेक्षां आणखी काय उघड करून सांगूं ? साहसाशिवाय प्रेम नाहीं नि प्रेमाशिवाय साहस नाहीं. प्रेमांत आणि लढाईंत साहस हवं असतं—प्रेमांत आणि लढाईंत निधड्या छातीच्या माणसानं वाटेल तो अविचार केला तर तें शूराचं लक्षण ठरतं. व्यवहारांत विचार पाहिजे, तसा लढाईंत अविचार पाहिजे—

**खंडेराव**—अन् प्रेमांत देखिल ?

**चंदाः**—हो हो, प्रेमांत देखिल ! पण हें आपलं माझं पुस्तकी ज्ञान आहे. अजून या प्रेमांत मला कांहीं कळत नाहीं. कधींकाळीं कळेल असंही मला वाटत नाहीं. तें नाहींच माझ्या रक्तांत. माझ्या रक्तांत नुसती लढाई आहे—नुसता उद्दामपणा आहे. प्रेमाला नाहीं चालत ही वृत्ती—( हंसून ) असं कुणी म्हणतात हो !—

**खंडेरावः**—खरं आहे तें.

**चंदाः**—मग प्रेमाला कसली वृत्ति पाहिजे ?

**खंडेरावः**—अशी भेकड वृत्ति खास नव्हे—

**चंदाः**—नव्हेच नव्हे. मला वाटतं, आईला विचारलं पाहिजे का ? दचकलांतसे ? हातीं आलेलं प्रेमाचं प्यादं फेकून तिनं डाव उधळून लावला अन् आतां रडत बसलीय ! तिला विचारून ती मला काय सांगणार म्हणा !

**खंडेरावः**—खरं आहे !

**चंदाः**—नि तुम्हांला विचारावं म्हटलं, तर तुमची ही अशी दांतखिळी बसलेली. चांगली तापवलेली पळी घातल्याशिवाय कांहीं तुमची ही दांतखिळी उघडायची नाहीं.

**खंडेरावः**—खरं आहे.

**चंदाः**—( ताड्कन् उठून उभी राहून ) लाज नाहीं वाटत 'खरंय' म्हणायला ? मर्दासारखे मर्द तुम्हीं—हातचा डाव फेंकून दिलात—

**खंडेराव**:—नाहीं—डावच पळाला माझ्या हातून, त्याला मी तरी काय करूं? घट्ट मुठींत धरून ठेवलेलं प्यादं केव्हां मूठ उघडून गेलं तें मला कळलं सुद्धां नाहीं—

**चंदा**:—हाच तुमचा वेंधळेपणा तो!

**खंडेराव**—नाहीं-हा माझा प्रेमळपणा—

**चंदा**:--नाहीं. वेंधळेपणा म्हणजे प्रेमळपणा नव्हे. झालं तें झालं, आतां असं करा-- ( पुष्पा येते )

**पुष्पा**:—तूं आहेस ना इथं?

**चंदा**:—तर कुठं असायची मी? काय एवढा जीव चालला होता माझ्याविना?

**पुष्पा**:—( दोघांकडे आळीपाळीनें पहात ) अस्सं! माझा अडथळा झाला होय?—( पुन्हां एकदां दोघांकडे पाहून ) शेवटीं असं झालं ना!—एवढ्या लढाईच्या गप्पा मारतां मारतां कारकुनाशीं कानगोष्टी करण्यावर पाळी आली ना!

**चंदा**:—कां? तुला मत्सर वाटला माझा?—कीं तुझी नजर होती आधीं?

**खंडेराव**:—कुणावर? माझ्यावर? मी काय केलं! काय अपराध झाला माझा? अशी कां शिक्षा देतां मला! ( चंदा मोठमोठ्यानें हंसते—पुष्पा अस्वस्थ होऊन खंडेरावाकडे रोखून पाहते ) हंसूं नका, हंसूं नका—कुणी हंसलं कीं तोल सुटतो माझा—किती वेळ सांगू—( चंदा हंसत हंसत निघून जाते ) गेली? ठीक झालं. मोठी भीति वाटते मला तिची.

**पुष्पा**:—अन् माझी?

**खंडेराव**:—छे, छे! तुम्हीं आलां तर उलट जरा बरंच वाटतं.

**पुष्पा**:—होय ना? तरी मी म्हटलंच!—मला वाटतच होतं—म्हटलं, का एवढे हे खंडेराव मी आलें कीं नर्व्हस होतात? तें असं आहे होय?

**खंडेराव**:—जी.

**पुष्पा**:—मग कृपाताईबरोबर गेले दोन तीन दिवस जिन्याखालीं आड राहून सारख्या कसल्या कानगोष्टी करीत होतां?

**खंडेराव**:—( चांचरत ) याच—याच त्या गोष्टी—

**पुष्पा**:—असं होय? म्हणजे, माझ्याकडे बोलायला—उघड उघड बोलायला तुम्हांला संकोच वाटत होता?

**खंडेराव**:—नाहीं—मी लाजत होतों विचारायला.

**पुष्पा**:—असं होय ?

**खंडेराव**: — जी.

**पुष्पा**:—मग आतां विचारा ना.

**खंडेराव**:—काय विचारूं ?

**पुष्पा**:—हें आतां जें विचारायला तुम्हीं लाजत होतां तें.

**खंडेराव**:—तेंच कसं विचारायचं तें कळत नाहीं ना मला! तें कळलं असतं तर इतके दिवस कां उगीच तोंड दाबून राहिलों असतों ?

**पुष्प**:—मग कृपाताईनं काय सांगितलं ?

**खंडेराव**:—त्या म्हणाल्या,—म्हणजे तें असं झालं, त्या पुष्कळसं कांहीं सांगत होत्या नि माझं लक्ष होतं—( दचकून इकडे तिकडे पाहून हळुच तिच्या कानाशीं ) माझ्या प्रेमविषयाकडे—

**पुष्पा**:—म्हणजे माझ्याकडे ?

**खंडेराव**:—जी. तेव्हां त्यांनीं काय सांगितलं तें मला मुळींच ऐकूं गेलं नाहीं—कानांतच शिरलं नाहीं कांहीं—अन् ध्यानांत तर मुळींच राहिलं नाहीं—असा घोटाळा झाला !—

**पुष्पा**:—पण आतां बोलतांहां कीं माझ्याशीं.

**खंडेराव**:—जी ! पण तें माझ्या अक्कलहुषारीप्रमाणं. तें जें कांहीं तिनं—अं हं—त्यांनीं मला शिकवायचा प्रयत्न चालवला आहे आज दोन तीन दिवस, तें सारंच विसरून गेलं ! मोठं छान छान शिकवीत होत्या त्या, पण खरं सांगूं तुम्हांला पुष्पाताई.—

**पुष्पा**: – आतां काय सांगावं तुम्हांला ! 'ताई' म्हणायचं नाहीं मला.

**खंडेराव**:—जी. पण आजवर म्हणत होतों ना ?—हें असं होतं. या असल्या प्रपंचांतल्या गोष्टी मला चांगल्याशा कळत नाहींत नि त्यामुळं हा हा असा फजितीचा प्रसंग येतो. तेवढं कुणीतरी सावरून घेतलं पाहिजे मला-

**पुष्पा**:—त्याची नको तुम्हांला काळजी. मी घेईन सावरून. आतां हेंच पहा, पहिल्यापासून ही आमची कृपा चुका करीत आलीय. पूर्वी झालं तें झालं पण आतां फार जपून वागलं पाहिजे, हें कांहीं तिच्या ध्यानीं येत नाहीं. ही आतां गेले चार दिवस आडोशांत तुमच्याबरोबर बोलत असते—हंऽहं–तें

आतां कळलं मला — अन् ती चंदा तशीच आडोशांत राहून सारखी टेहळणी करीत असते. आतां तिनं जाऊन सरसाहेबांना कांहीं सांगितलं—

**खंडेराव**:—छे छे, ती नाहीं सांगायची.

**पुष्पा**:—तुम्हांला नाहीं कळायचं तें ! तुम्हीं माझं ऐका—

**खंडेराव**:—जी.

**पुष्पा**:—तिनं कांहींतरी चहाडी करायच्या पूर्वी जें कांहीं करायचं तें उरकून घेतलं पाहिजे—

**खंडेराव**:—म्हणजे ?

**पुष्पा**—म्हणजे काय ? आपण पळून जायचं.

**खंडेराव**:—कोण कोण ?

**पुष्पा**:—तुम्ही न् मी —( खंडेराव मट्कन खालीं बसतो )

**पुष्पा**:—काय हो, काय झालं ?

**खंडेराव**:—( हळुहळु उठून उभा रहात ) छे, नाहीं ! नाहीं आपली छाती व्हायची. समज, आपण गेलों पळून अन् यांनीं दिली वर्दी पोलिसांत !— छे:, नाहींच.

**पुष्पा**:—त्याची नको काळजी. आपण जाऊं आर्यसमाजांत नि वर्दी द्यायच्या पूर्वींच घेऊं लग्न उरकून !

**खंडेराव**:—अरे बापरे ! तें नाहीं जमायचं. आर्यसमाजाच्या शेजारींच म्हारबावडी पोलिस स्टेशन आहे—अचानक जाऊन पडूं पोलिसांच्या मगर-मिठींत—छे:, नाहीं ! तें आपलं सिव्हिल मॅरेजच बरं—

**पुष्पा**:—पण त्याला नोटिस लागते ना चवदा दिवसांची ?

**खंडेराव**:—हो, तेंही खरंच. चवदा दिवस कुठं लपून बसणार ? सांग ना, कुठं लपून बसणार ?

**पुष्पा**:—अगदींच बावळट आहांत तुम्हीं !

**खंडेराव**:—जी.

**पुष्पा**:—पुढला विचार करूं नका कांहीं—( कृपा येते ) आधीं आपण पळून जाऊं—पुढलं पाहतां येईल.

**कृपा**:—कुठं जाणार पळून ? कोण जाणार ?

**पुष्पा**:—झालं ! हिनं ऐकलं !—

**खंडेराव**:—ऐकेनात का. त्यांना मी सांगितलंच आहे सारं.

**पुष्पा**:—हो खरं, ते मी विसरलेंच होतें. बरं का कृपाताई, आम्हीं पळून जाणार आहोंत.

**कृपा**:—तें कां? पळायला कशाला हवं? कोण आड येतंय तुमच्या? मी कांहीं नको म्हणत नाहीं—सरसाहेबांचा कांहीं संबंध नाहीं यांत—

**खंडेराव**:—हो खरंच—हें मी अगदींच विसरलों होतों.

**पुष्पा**:—काय खरंच? पळून जायचं नाहीं तर त्यांत मग रोमान्स् कसला? सरळ सरळ लग्न लावलं तर इतरांत नि आमच्यांत फरक काय? तें कांहीं नाहीं—आपण पळून जाऊं—

**खंडेराव**:—नि यांनीं पोलीसांत वर्दी दिली नाहीं तर? मग पळून जाण्यांत काय गम्मत राहिली?—यांनीं तर आतां उघड उघड सांगितलं, कीं आपला कांहीं विरोध नाहीं—नि सरसाहेब कांहीं लक्ष घालायचे नाहींत—मग वर्दी कोण देणार पोलिसांत?

**पुष्पा**:—चंदेला सांगूं आपण वर्दी द्यायला.

**खंडेराव**:—छे: तिच्यावर नाहीं माझा विश्वास—(सुचल्यासारखें करून) आपण असं करूं—आपणच वर्दी देऊं पोलिसांत—

**पुष्पा**:—आपणच पळून आपणच कशी वर्दी द्यायची? अगदींच बावळट आहांत तुम्ही. कांहीं अर्थ नाहीं तुमच्याशीं बोलण्यांत.—ते कॅप्टनसाहेब आलेयत का ग ताई?

**कृपा**:—कॅप्टन गोखले ना? ते तिकडे बोलत बसले आहेत लायब्ररींत.

**पुष्पा**:—काय बोलताहेत? चंदा नाहीं ना तिथं?

**कृपा**:—नाहीं वाटतं. पहा ना जाऊन.

**पुष्पा**:—त्यांनाच गाठलं पाहिजे आधीं. या बावळ्या ध्यानाला बोललेलं सुद्धां धड कळत नाहीं.

[ पुष्पा बोलत बोलत जाते. ती जातांच खंडेराव गंभीर होतो—कृपा दारापर्यंत जाऊन पाहून परत येते. क्षणभर दोघेंही कांहीं बोलत नाहींत ]

**खंडेराव**:—पळून जायची गोष्ट काढली या वेडपीनं, तेव्हां मी एकदम घाबरलों. म्हटलं, कळलं कीं काय हिला? (क्षणभर स्तब्ध) तुझा निश्चय कायम आहे ना अजून?

कृपा:—मन कसं हेलकावे घेतंय ! जिकडे तिकडे डांगोरा पिटला जाईल. पळून पळून तरी आपण कुठं जाणार ? हे लढाईचे दिवस, परदेशीं जाईन म्हटलं तर तीही बंदी. काय करूं ?

खंडेराव:—मन घट्ट कर. मनावरचा ताबा एकदां सुटला होता त्यावेळीं ही चूक करून बसलीस—आतां पश्चात्ताप करीत बसली आहेस. ती एकदां झालेली चूक दुरुस्त करायची संधि आहे ही—

कृपा:—एका चुकीची दुरुस्ती दुसऱ्या चुकीनं का होणार आहे ?

खंडेराव:—दुसरी चूक ? ही चूक नव्हे–ही दुरुस्ती आहे पूर्वी केलेल्या चुकीची.

कृपा:—पण लोक काय म्हणतील ?

खंडेराव:—लोक काय म्हणतील म्हणे ! साठीला पोंचलेल्या म्हाताऱ्याशीं लग्न केलंस त्यावेळीं लोकांनीं काय पुष्पवृष्टि केली तुझ्यावर ? त्यावेळीं लोकांनीं थोडी का विटंबना केली तुझी ? काय काय लिहिलं त्यावेळीं वर्तमानपत्रांनीं ! त्यावेळीं तें सारं पचवलंस नि यावेळीं मात्र तुला लोकापवादाची भीति वाटूं लागली अं ? एकदां आगीच्या फुपाट्यांतून चालत गेलीस,—

कृपा:—म्हणून पुन्हाही तसंच करूं ? पुनः तोंड देऊं तसल्या त्या भडिमाराला ?

खंडेराव:—एकदां संवय झाली आहे ना ? आंगवळणीं पडलं आहे ना ? आतां कशाला भीतेस ? एवढीशी पोर ती चंदा, तिला कळतं—

कृपा:—तिला कळतं ! काय कळलं तिला ? काय म्हणत होती ती ? हें कसं कळलं तिला ? बोलली तर नाहीं ना कुणाकडे ?

खंडेराव:—मोठी धीराची आहे ती पोर ! मोठं कौतुक वाटतं तिचं मला ! त्या दिवसापासून तिनं सारखी नजर ठेवलीय तुझ्यावर—घाबरूं नकोस—दगा देण्यासाठीं नव्हे, तुला मदत करण्यासाठीं—सारखी नजर ठेवली होती म्हणूनच तिनं अचुक अंदाज केला. अगदीं उघड उघड जरी नाहीं तरी ती असंच सांगत होती मला आतांच—

कृपा:—काय सांगत होती ? पळून जा म्हणून सांगत होती ?

खंडेराव:—धाडस करा म्हणून सांगत होती, 'साहसाशिवाय प्रेम नाहीं नि प्रेमाशिवाय साहस नाहीं !'—किती गोड वाटले तिचे ते शब्द मला ! 'व्यवहारांत विचार पाहिजे—लढाईत नि प्रेमांत अविचार पाहिजे !—'

**कृपाः**—असं ती म्हणाली !

**खंडेरावः**—हो, अगदीं तिचेच शब्द सांगतोंय मी हे. लढवय्याचं रक्त बोलत होतं तें ! हें पाहिलं म्हणजे वाटतं, पुढली पिढी मर्द बनावी म्हणून तरी या लढाईवर जावं !

**कृपाः**—(अर्धवट स्वगत) चंदा असं म्हणाली ! स्वतः गेली असती का ती अशी ?

**खंडेरावः**—हा असा प्रसंगच तिच्यावर आला नसता. चंदा कवयित्री नाहीं—भावनेनं भुललेली नाहीं—धुक्यावर तरंगायची तिला संवय नाहीं—कल्पनेचे मनोरे बांधून आभाळाला हात लावायचा प्रयत्न करणारी नाहीं ती पोर ! (कृपा हळुहळु बैठकींत कोसळते) खचलीस ? पुनः कल्पनेवर खेळूं लागलीस ? पुढं होणारे लोकनिंदेचे मारे दिसूं लागले तुला होय ? त्या माऱ्याला घाबरलीस ! प्रेमांत नि लढाईत यशापयशाची तोंडमिळवणी पहायची नसते. हें असं पाहिलं म्हणजे वाटतं, कीं ही असली कोवळी लढाई खेळण्यापेक्षां सरळ लढाईच्याच आघाडीवर जावं. यश नसलं तरी मरणाची तरी खात्री आहे तिथं ! इथं यशही नाहीं,—मरणही नाहीं ! (दुसऱ्या टोंकाला जाऊन एका बैठकीवर बसतो )

[ खंडेराव धुमसत बसला आहे. कृपा वर डोळे लावून आसवें गाळीत आहे, इतक्यांत चंदा येते, दुरून दोघांकडे पाहते आणि दोघांसमोर येऊन पुढें उभी रहाते. ]

**चंदाः**—भांडलांत वाटतं ?—( कुणीच उत्तर देत नाहीं. ) नाहीं ?—( एकदम धांवत जाऊन कृपेच्या गळ्यांत हात टाकून ) रडते आहेस आई !

**कृपाः**—कृपा करून मला ' आई ' म्हणूं नकोस !

**चंदाः**—कां रडतेयस ? काय झालं ?

**कृपाः**—तुला काय वाटतं ?

**चंदाः**—मला वाटतं, ज्या निधडेपणानं तूं बाबांशीं लग्न केलंस, ती वृत्ति आतां मावळून गेलीय. तो बेछूटपणा आतां राहिला नाहीं तुझ्या अंगीं. त्यावेळीं कशी सर्वांना तोंड देत होतीस ? आतांच काय झालं तुला ?

**खंडेरावः**—( त्यांच्याकडे न पाहतां ) म्हाताऱ्याच्या संगतीनें ती आतां म्हातारी झाली आहे !—थकली आहे !—खचली आहे !—खंडेराव कारकुनापेक्षांही दुबळी झाली आहे !

चंदा:—( कृपेला ) होय !

कृपा:—( एकदम ताड्कन् उठून ) सर सोमनाथांची मुलगी विचारतेय हें मला ? मला ? त्यांच्या पत्नीला ?

चंदा:—पत्नी ! माझी मोठी बहिण तुझ्याहूनही मोठी होती. आज ती हयात असती तर तिनं काय म्हटलं असतं तुला ? 'आई' म्हटलं असतं ? सर सोमनाथांची पत्नी म्हटलं असतं ? मी तुला आई म्हणतें, तें काय तूं माझी आई आहेस असं मला वाटतं म्हणून ? पत्नी म्हणे ! एकदां खाईत उडी घेतलीस—डोळे झांकून उडी घेतलीस—आतां चांगले डोळे उघडून त्या खाईबाहेर उडी घे !

कृपा:—( डोळे तारवटून पहात ) चंदा ! चंदा तूं म्हणतेस हें ! मला ? या खाई 'बाहेर' मी उडी घेऊं ?

चंदा:—तुला काय वाटेल तें कर ! मी कांहीं अविचार केला नाहीं—बापाएवढया म्हाताऱ्याशीं कांहीं मी लग्न केलं नाहीं ! दुष्ट माणसं दुसऱ्याचा नाश करतात, स्वतःचा नाश करणाऱ्या माणसाला दुष्ट म्हटलेलं देखिल चांगलं दिसायचं नाहीं. [ कृपा रडूं लागते, तिच्या गळ्यांत हात टाकून ) माफ कर कृपाताई, मला माफ कर. वडिल बहिणीला मी असं बोलायला नको होतं.

कृपा:—( तिला कवटाळून ) चंदा—माझी चंदा—माझी लाडकी चंदा ! केवढा धीर दिलास मला ? केवढं अवसान आलंय मला आतां ! ( खंडेरावासमोर जाऊन ) काय हो ! स्वस्थ कां बसून राहिलाहांत ? विचार कसला करतांहां ? ऐकलंत ना माझी एवढीशी चंदा काय म्हणाली तें—ऐकलंत ना ? आतां उडी घ्यायची ना खाईबाहेर ?

खंडेराव:—( घाबरत ) कुठल्या खाईबाहेर !

[ एका बाजूनें कृपा आणि दुसऱ्या बाजूनें चंदा त्याच्याकडे रोखून पहात असतात—तोही घाबरल्यासारखें करून आळीपाळीनें त्यांच्याकडे पहात असतो—पहातां पहातां कावराबावरा होतो ]

खंडेराव:—असं पाहूं नका माझ्याकडे—कुणी असं रोखून पाहिलं की माझ्या उरांत धडकी भरते.

चंदा:—आतां किती ढोंग कराल ?

खंडेरावः—( उठून उभा रहात ) नाहीं चंदा, हें ढोंग नव्हे—खरोखरीच मला धडकी भरते—

चंदाः—आतांच आईबरोबर चांगले माणसासारखे बोलत होतां नि इतक्यांत काय झालं तुम्हांला ?

खंडेरावः—हें असं झालंय ! ही एकटी असली, ही एकटी असतांना हिच्या-बरोबर बोलत असलों, कीं चांगला माणसासारखा माणूस असतों—कारकून आहें याची आठवणसुद्धां नसते तेव्हां—पण दुसरं कुणी माणूस आलं—( एकदम बैठकींत बसतो )

चंदाः—या घरची हवा तुम्हांला मानवलेली दिसत नाहीं. आतां जाच एकदां इथनं निघून. ( कृपेला ) ऐकलंस ? यांना ओढून बाहेर काढ या घरांतून. या घरांतून बाहेर गेल्याशिवाय—

खंडेरावः—एकटाच ?

चंदाः—नाहीं. चांगली मोलाची सोबत देऊन तुम्हांला या घरांतून बाहेर काढल्याशिवाय तुम्हीं माणसांत येणार नाहीं. ( कृपेला ) ऐकूं येतंय का तुला ? अशी सुन्न कां झालीस ? या क्षणाला या माणसाला या घरांतून बाहेर काढला नाहीं तर याची कांहीं धडगत नाहीं. ( कॅप्टन गोखले येतो ) ऐकूं येतंय कीं नाहीं तुला ? आत्तांच्या आत्तां या माणसाला बाहेर काढ या घरांतून.

कॅप्टनः—काय झालं ? काय झालं ? काय केलं यानं ?

चंदाः—सारी हवा बिघडवून टाकली या घरची. जो उठला तो लग्नाच्या गोष्टी बोलूं लागला. तिकडे लढाई सुरू झालेली, अगदीं सरहद्दीला येऊन भिडलेली नि लग्नाच्या गोष्टी बोलताहेत !

कॅप्टनः—कोण ? कोण ?

चंदा—कोण काय , प्रत्येक जण ! घरचीं दारचीं माणसं, पाहुणे रावळे, भेटायला येणारा सगा सोयरा—गडी माणसं—फार काय, कुत्रीं मांजरं सुद्धां लग्नाच्या गोष्टी बोलूं लागलींयत !—तो पिंजऱ्यांतला पोपटसुद्धां ‘ सावधान, सावधान ’ म्हणून ओरडतोय ! ( कृपेला ) ऐकलंस ना तें ? ( खंडेरावाला ) बसलांहां काय मुडद्यासारखे ? उठा, चला—लागा आपल्या कामाला—( खंडेराव आपल्या टेबलाजवळ बसायला जातो ) ती खरडेघाशी नव्हे !—

निघा इथनं—निघा या घराबाहेर—( असें म्हणून त्याचा हात धरून त्याला ओढून घेऊन जाते )

**कॅप्टनः**—काय झालं ? काय केलं या कारकुनानं ?

**कृपाः**—( चांचरत ) मला सुद्धां कांहीं माहित नाहीं. ही मी आलें इथं—पाहिलं—खंडेराव अगदीं घाबरले होते—नि ही सारखी त्यांना ताडताड बोलत होती. काय झालं तें विचारायला सुद्धां दिलं नाहीं तिनं मला.

**कॅप्टनः**—जाऊं दे ! आतां गेलायच तो इथनं ! बरं झालं. मोठा ओंगळ माणूस आहे तो. जवळपास असला कीं सारी हवा सर्द करून टाकतो—ग्लानी आणतो सर्वांवर. कां असला हा माणूस इथं ठेवलाय ?

**कृपाः**—म्हणूनच ठेवलाय इथं त्याला. तसं कुणी नसलं इथं, तर चेकाळून जायचीं इथलीं माणसं. लढवय्याचं घर आहे हें—या अन्नांतच असा कांहीं गुण आहे, इथलं घांसभर अन्न पोटांत गेलं तर गाय सुद्धां वाघावर चालून जाईल.

**कॅप्टनः**—अगदीं अक्षरशः खरं आहे तुमचं म्हणणं—( बसतो ) बसा ना—आतां जाणार आहें मी. आसामच्या सरहद्दीवर जाऊन हजर व्हायचंय मला. त्यापूर्वी—

**कृपाः**—त्यापूर्वी मुहूर्त नसले तरी हिंदू मॅरेज व्हायला कांहीं हरकत नाहीं. आर्यसमाज आहे—सुंदरराव वैद्य आहेत—

**कॅप्टनः**—चंदा म्हणाली तें कांहीं खोटं नाहीं, प्रत्येकजण लग्नाच्या गोष्टी बोलतोय.

**कृपाः**—मग तुम्हांला कसल्या गोष्टी हव्यात ?

**कॅप्टनः**—शिपायाच्या बाण्याला शोभतील अशा कांहींतरी गोष्टी ऐकायला हव्यायत मला.

**कृपाः**—लढाईच्या ?

**कॅप्टनः**—नव्हे—लग्नाच्याही नव्हेत—लढाईवर निघालेल्या शिपायाला ज्या गोष्टी ऐकाव्याशा वाटतात त्या ऐकायला हव्यायत मला—( क्षणभर स्तब्धता ) शिपाई लढाईवर जायला निघाला कीं जिवावर उदार झालेला असतो. मरण डोळ्यासमोर दिसत असतं, वृत्ति बेफाम होते त्यामुळं, बरं-वाईट कांहीं कळत नाहीं त्यावेळीं.—नीतिअनीतिच्या कल्पना साऱ्या पार

विरघळून जातात त्याच्या बेफाम मनांतून. एकदां सुखाचा पेला आकंठ पिऊन घ्यावा एवढंच असतं त्याच्या नजरेपुढं. कळलं का मी काय म्हणतों तें ?

**कृपा**:—नाहीं. ही भाषा मी नव्यानंच ऐकतेंय.

**कॅप्टन**:—आश्चर्य आहे. लढवय्याच्या घरांत या गोष्टी ऐकूं येऊं नयेत हें मोठं आश्चर्य आहे.

**कृपा**:—तें असं आहे—हें घर लढवय्याचं असलं तरी पेन्शनर लढवय्याचं आहे. तरण्या जवानाचं नव्हे. लढाईवर जायला निघालेल्या जवान शिपायाचं नव्हे, म्हणून ही असली भाषा इथं ऐकूं येत नाहीं.

**कॅप्टन**:—पण तुम्हीं कवयित्री आहां. तुमच्या कवितांवर भावनाशील तरुणांच्या एकाकाळीं उड्या पडत होत्या. मोठमोठ्या बुद्धिवादी लेखकांना-सुद्धां आपल्या रंगेल कवितांनीं तुम्हीं झुलवलं होतं—

**कृपा**:—पण आतां मी म्हातारी झालेंय !

**कॅप्टन**:—( मोठ्यानें हंसत ) म्हाताऱ्याशीं लग्न केल्यानं कांहीं माणूस म्हातारं होत नाहीं. उलट तरुणीशीं लग्न करणारा म्हाताराच स्वतः जवान झाल्याचा आव आणीत असतो.

**कृपा**:—पण आमच्या घरीं तसं झालं नाहीं. म्हातारपणाचाच अभिमान आहे मोठा सरसाहेबांना. हरघडीला म्हातारपणाचाच डांगोरा पिटीत असतात ते·—

**कॅप्टन**:—म्हणूनच म्हणतों, माझी भाषा तुम्हांला कळायला हवी होती. जवानीचा आव आणणारा म्हातारा तरुणीला कदाचित दुःसह होत असेल पण म्हातारपणाचा बडेजाव मिरवणारा म्हातारा तरुणीला तिटकारा कसा आणीत नाहीं याचंच आश्चर्य वाटतं मला.

**कृपा**:—कॅप्टन गोखले, कुठं काय बोलतांहां याची आठवण आहे ना तुम्हांला ?

**कृपा**:—हो, आठवण आहे. आणि मी लढाईवर निघालोंय याचीही मला आठवण आहे. कशाला फसवून घेतांहां स्वतःला ? चार दिवसांची जिनगानी—उद्यांचं काय होईल याची खात्री नाहीं—माझ्यासमोर मरण उभं आहे तसंच तुमच्यासमोर देखील मरणालगतचं वार्धक्य मूर्तिमंत ठाण मांडून बसलं आहे. तरी सुद्धां तुम्हांला कसं वाटत नाहीं, कीं आल्या घडीचा

फायदा घेऊन जावं ? ( क्षणभर स्तब्धता ) माझ्या भाषणाचा अर्थ कळला का तुम्हांला ?

**कृपाः**—केव्हां जाणार आहांत तुम्हीं ?

**कॅप्टनः**—उद्यां. आजचाच दिवस ! आतां हा एकच दिवस—एकच दिवस कसला—कांहीं तास राहिले आहेत. त्या या एवढया घडींत लढाईवर जायच्यापूर्वी स्वर्गाला हात लावावा असं क्षणभर माझ्या मनांत कां येऊ नये ?

**कृपाः**—मरणाच्या पोटीं शृंगार असतो हें अजून मला माहित नव्हतं. काव्यं रेखाटतांना कवि अस्मानांत भराऱ्या मारतो, पण जमिनीवर काय चालत असतं याची त्याला दखलगिरी नसते, तसंच झालंय माझं. आतां वाटतं,—हें तुमचं भाषण ऐकल्यावर वाटतं, पूर्वीं लिहिलेलीं तीं सारीं काव्यं जाळून टाकावीं !

**कॅप्टनः**—तें पूर्वींच झालंय. हल्लीं तुम्हीं या लढाईच्या कविता लिहायला सुरवात केल्यापासून ती तुमची पूर्वींची प्रतिभा मावळूं लागलीय.

**कृपाः**—पूर्वींची प्रतिभा कीं पूर्वींचा मूर्खपणा ? या लढाईनं मला कितीतरी शहाणं केलंय कॅप्टन गोखले. माणसाची किंमत पूर्वीं मला कळत नव्हती—आतां कळूं लागली आहे—पण फार उशिरां—

**कॅप्टनः**—उशिरां कां ? लढाईपूर्वींच्या एका क्षणांत अनंतकालाची अनुभूति मिळत असते. त्या एका क्षणासाठींच—( तिच्या जवळ जातो. )

**कृपाः**—( उठून बाजूला होऊन दरडावून ) कॅप्टन गोखले !

**पुष्पाः**—( प्रवेश करून दाराशींच ) इथं आहेत का कॅप्टन ?

**कृपाः**—( वळून पाहून हंसून ) हो—आहेत. ये ना.

**पुष्पाः**—ऐकलंस कृपाताई, कॅप्टनसाहेबांबरोबर आज मी सिनेमाला जाणार आहें—नि मग—( हंसते ) आम्हीं सारी रात्र हिंडणार आहोंत मुंबईत मोटारींतून !

**कृपाः**—( कॅप्टनला ) असं का ?

**कॅप्टनः**—तसं म्हटलं तिनं—मी आपलं सहज 'होय' म्हटलं—एवढंच तें !

**पुष्पाः**—वाः ! म्हणजे मला बनवलंत वाटतं ?

**कॅप्टनः**—छे छे ! पण तें असं झालं—लेडी सोमनाथ येणार असल्या तर मग तुला येतां यायचं नाहीं.

**पुष्पाः**—( कृपेला ) होय ? तूं जाणार आहेस यांच्याबरोबर ?

**कृपाः**—उद्यां जाणार आहेत ते लढाईवर—तेव्हां म्हटलं, पुनः केव्हां भेट होईल अशा माणसांची तें कांहीं सांगतां यायचं नाहीं. ते म्हणाले, येतां का ? मी म्हटलं—

**कॅप्टनः**—हो. Thanks Lady Somnath, thank you so much.

**पुष्पाः**—हें बरं नव्हे कृपाताई. कुठं एकदां मला हा चान्स मिळाला होता तर तूं अशी आड येतेयस. असं करा कॅप्टन, मीही येतें तुमच्याबरोबर.

**कृपाः**—छे छे, ही असली तर मी मुळींच यायची नाहीं. अन् मग चंदा सुद्धां म्हणेल आपणही येणार म्हणून. हा सारा घोळका गोळा करून काय धिंगाणा घालायचा आहे तिथं ? लढाईवर जाणाऱ्या माणसाबरोबर जायचं म्हणजे अगदीं एकांतांत कानगोष्टी करायला जायचं—तिथं दुसरं कुणी खपायचं नाहीं—

**पुष्पाः**—तर मग आपण असं करूं कॅप्टन, कृपाताईला सिनेमाला घेऊन जा, नि सिनेमा संपला कीं मी येईन तुमच्याबरोबर हिंडायला.

**कॅप्टनः**—आतां मोठी पंचाईत आली. त्यापेक्षां आपण असं करूं, सिनेमाला तूं ये—

**कृपाः**—अन् सिनेमा संपला कीं आम्हीं जाऊं फिरायला—सारी रात्र साऱ्या मुंबईभर भिंगऱ्या मारायला. ( चंदा येते ) आतां आणखी ही आली !

**चंदाः**—कां ? कुठं जाणार आहांत भिंगऱ्या मारायला ? यांच्याबरोबर कीं काय ? तें नाहीं जमायचं बरं ! आज आपला साखरपुडा व्हायचा आहे. होय ना हो कॅप्टन ?

**कॅप्टनः**—असं मी कुठं म्हटलं ?

**चंदाः**—बाबांकडे कबूल केलंत ना आतांच ?

**कॅप्टनः**—तें असं झालं, सरसाहेब तसं म्हणाले—अन् मी आपला सहज होय म्हणून गेलों. असं पहा चंदाबाई—

**चंदाः**—बाई काय म्हणतां—नुसतं चंदा म्हणा. लग्न करणार आहांत ना माझ्याशीं ?

**कॅप्टनः**—जगून परत आलों तर.

चंदाः—माझ्याशीं साखरपुडा केला कीं तुम्हाला मरायची भीति नाहीं. माझ्या वाङ्निश्चित वराला घेऊन जायची काय टाप लागलीय यमाची ! सावित्रीसारखी पिच्छाला लागेन यमाच्या.

पुष्पाः—खरंय तें !

चंदाः—म्हणजे शंका आली तुम्हां लोकांना ? ( कॅप्टनला ) कुठं जायचा बेत चालला होता ?

पुष्पाः—एव्हांच सत्ता गाजवूं लागली !

चंदाः—बोला ना–कसले कट करीत होतां ?

कॅप्टनः—आतां कुठं जायचं नाहीं, सिनेमाला नाहीं, भिंगऱ्या मारायला नाहीं—आतां सरळ जायचं तें आसामच्या सरहद्दीवर. तें मरण पत्करलं पण ही विटंबना नको. ( पळत जातो )

[ सर सोमनाथ, दिवाकर, दिनकर, ब्रह्मानंद, सदानंद यांच्यासह प्रवेश करतो. ]

सर सोम०ः—कुठं गेले कॅप्टन ?

चंदाः—ते गेले आसामच्या सरहद्दीवर.

सर सोम०ः—इतक्यांत कसे जातील ? साखरपुडा व्हायचा आहे ना तुझा ?

दिवाकरः—कुणाचा ?

सर सोम०ः—लढाईवर जायच्या पूर्वी वाङ्निश्चय करून टाकणार आहे या चंदेचा त्या कॅप्टन गोखल्याशीं.

दिवाकरः—म्हणूनच गेले वाटतं तें आसामच्या सरहद्दीवर ? घाबरले !

सर सोम०ः—( कृपेला ) कुठं गेले कॅप्टन गोखले ?

कृपाः—खरं सांगतेय ती. खरोखरच ते आसामच्या सरहद्दीवर जातों म्हणून गेले.

सर सोम०ः—( मोठमोठ्यानें हंसत ) कशी एकाहून एक बावळट माणसं आहेत हीं दिवाकर ! माझा निरोप घेतल्याशिवाय कसा जाईल तो ? लढवय्या माणूस मोठा रसिक असतो—

कृपाः—खरंच का ? मला माहित नव्हतं हें.

सर सोम०ः—आतां हीं इतकीं वर्षे नाहीं का अनुभव आला तुला ? खरोखरच लढवय्या माणूस मोठा रसिक असतो. त्यांतून हा तरणा जवान–

**चंदा**:—हं! तरणा जवान म्हणे!

**सर सोम०**:—गप बैस. खरोखरच तो मोठा रसिक माणूस आहे. काव्याची मोठी आवड आहे त्याला. हिच्या कवनांची केवढी तारीफ करीत होता माझ्याजवळ!

**कृपा**:—असं का? तरीच!

**सर सोम०**:—काय तरीच?

**कृपा**:—मला फिरायला बोलवीत होते ते आपल्याबरोबर—

**पुष्पा**:—अन् मलाही. मी जाणार आहें त्यांच्याबरोबर सिनेमाला—अन् मग ताई जाणार आहे त्यांच्याबरोबर फिरायला.

**चंदा**:—पण हे सारं माझा साखरपुडा झाल्यानंतर बरं—आधीं नव्हे. एकदां मिळूं देत तरी माझ्या तावडींत, मग कसे जातात यांच्याबरोबर तें पहातें.

**दिनकर**:—काय चढाओढ लागली आहे! अन् आमच्याकडे कोण ढुंकूनसुद्धां बघत नाहीं! एवढे आम्हीं लेखक—एवढे कवी—हे वर्तमानपत्रकार—जगाचं राजकारण उस्करीत बसलेयत, पण कुठली कोण पोरटी आम्हां लोकांसाठीं कांहीं हमरीतुमरीवर येत नाहीं. अन् हा कालचा शिपाई, लढाईच्या अजून चार गोळ्यासुद्धां खाल्या नाहींत बेट्यानं, तोंच ही अशी अनंगरंग याकुती पचवायला लागलाय!

**दिवाकर**:—कळलं ना हें? मग कां जात नाहींस लढाईवर?

**सर सोम०**:—नुसती चर्चा करूं नका, कंटाळा आला आहे या चर्चेचा. पहिल्यापासूनच आमचं हें चुकत आलं आहे. नुसती चर्चा करताहेत—

**चंदा**:—मग काय करायचं? चर्चा केल्याशिवाय का कांहीं ठरवतां येतं?

**सर सोम०**:—पण कसली चर्चा करताहेत? प्रत्येकजण सिव्हिल डिफेन्सच्या गोष्टी बोलतोय. मिलिटरी डिफेन्सचं काय? व्याख्यानं पहा, ब्रॉडकास्ट पहा कीं वर्तमानपत्रं पहा, सिव्हिल डिफेन्सखेरीज दुसरी बात नाहीं.

**दिवाकर**:—पण मिलिटरी डिफेन्सची चर्चा करायची नाहीं ना?

**सर सोम०**:—मग कसलीच चर्चा करुं नका. तुम्हीं हीं तरणींबांड मुलं—लढाई म्हटल्यासरशीं चढाओढीनं धावलं पाहिजे होतं फौजेंत, पण नुसते लेख लिहितां आहां वर्तमानपत्रांत—

चंदाः—अन् ते लेख तरी काय ? चेंबरलेनचं कुठं चुकलं, चर्चिलचं कुठं चुकलं, हिटलर कुठं घसरला आणि स्टॅलिन कुठं सावरला न् चांग-कै-शेकला कुणी खरवडलं—जसा कांहीं यांचा सारा जन्म लढाया लढण्यांतच गेलाय—

ब्रह्मानंदः—आमचे मुत्सद्दी तरी कुठं जाताहेत लढाईच्या मैदानावर ? ते देखिल घरीं बसूनच लढाया खेळवताहेत ना ? मग आम्हीं इथं घरीं बसून चर्चा केली तर त्यांत काय बिघडलं ?

दिवाकरः—आज उद्यां केव्हां तरी हें जोखिम आमच्यावरच येणार आहे ना ? मुत्सद्द्यांचींच कामं आहेत ना हीं ? त्याला कांहीं शौर्य पाहिजेच असं नाहीं.

दिनकरः—चुकतोयस दिवाकर, साध्या मुत्सद्द्यापेक्षां लढवय्या मुत्सद्द्याची किंमत आजच्या काळांत मोठी आहे. तें असं आहे—

सर सोम०ः—आतां जरा माझं ऐकाल ? मुत्सद्द्याच्या गोष्टी कशाला हव्यायत ? आज आपल्याला जरुरी आहे ती शिपायांची. तोफेला तोंड देऊन लढणाऱ्या शूरांची. अन् तुम्ही तर हे असले वाचीवीर—

चंदाः—परवां दिसलंच कीं एकेकाचं शौर्य !

दिवाकरः—असं हिणवूं नकोस चंदा. अचानक गोळ्या झाडल्यास म्हणून तें तसं झालं. आधीं अंदाज असता तर असल्या लाखों गोळ्यांना डगलों नसतों आम्हीं—

दिनकरः—ती नुसती गंमत केली आम्हीं. म्हटलं होऊन जाऊं द्या एकदां तुझ्या मनासारखं. तेवढ्यानं झालं ना तुझं समाधान ?

चंदाः—आतां कुणाचं खरं मानायचं ? यांचं कीं तुमचं ? ढोंग कशाला करतांहां ? दिवाळीचे फटाके वाजले शेजारीं तर पोलिसकडे तक्रार करणारे तुम्हीं ! तुम्हीं नुसते लेख लिहा. चुका काढीत बसा साऱ्या सेनापतींच्या. लढवय्याच्या जिण्याची तुम्हांला तिळाएवढीसुद्धां कल्पना यायची नाहीं.

ब्रह्मानंदः—अन् तुला येतेय ती कल्पना होय ? कुठं लढाया मारल्या होत्यास ?

चंदाः—लढाया मारल्या नसल्या तरी बराकीच्या अंगणांत खेळून वाढलेंय मी. पाळण्यांतून बाहेर पडल्यापासून मशिनगन्चे आवाज ऐकतेंय. तुमच्यापेक्षां मला चांगली कल्पना आहे त्या जिण्याची.

**सर सोम०:**—खरं आहे तिचं म्हणणं. फौजी जिण्याला आम्हीं जन्मतःच पारखे झालों आहोंत. लढाईच्या गोष्टी वाचून कांहीं लढाईची कल्पना येत नाहीं. प्रत्यक्ष अनुभव मिळाला पाहिजे तो. आतां ही संधि आली आहे तर तुम्हीं नुसते लेख लिहीत बसलांहांत—पूर्वजांचे पोवाडे गाताहांत—त्या पूर्वजांचीं नावं घ्यायला तुम्हांला शरम वाटली पाहिजे!

**दिवाकर:**—पोवाडे गाणारे तरी कुणी पाहिजेतच ना? नाहींतर इतिहास कसा झाला असता? आतां या लेडी सोमनाथनीं लिहिलेली ती कविता प्रसिद्ध झाली—केवढं कौतुक केलं आम्हीं त्या कवितेचं!

**चंदा:**—तेवढीच तुमची कर्तबगारी. तसली कविता कांहीं तुम्हांला लिहितां आली नाहीं. ती कविता जिनं लिहिली ती—

**सर सोम०:**—मेजर सर सोमनाथच्या पत्नीनं!

**दिवाकर:**—म्हणूनच ना आम्हीं त्या कवितेचं कौतुक केलं?

**चंदा:**—( कृपेला ) तूं ग कां गप बसलीयस? बोल ना कांहींतरी.

**पुष्पा:**—मी केव्हाची बोलेन बोलेन म्हणतेंय पण कुणी बोलूंच देत नाहीं मला.

**दिवाकर:**—लेडी सोमनाथांच्या कवितेनं केवढी स्फूर्ति दिली आम्हांला?

**सर सोम०:**—पण त्या फूर्तिचा परिणाम झाला का कांहीं?

**दिवाकर:**—हो हो, झाला तर. मी गेलों होतों वैमानिक शिक्षण घ्यायला अंधेरीला—पण शेवटीं सोडून आलों.

**सर सोम०:**—कां? अशी सोन्यासारखी संधि कां घालवलीस?

***दिवाकर:**—जेवणाची फार आबाळ होत होती तिथं. वरणभात मिळत नाहीं. लोणचं पापड तर मुळींच नाहींत. मग जिलब्या श्रीखंडाची गोष्ट कशाला?

**सर सोम०:**—नि हे तुम्ही शिवाजी-बाजीरावांच्या गोष्टी बोलतां! घोड्याच्या पाठीवर बसून डाव्या हातानं कणसं चुरडून खाणाऱ्या वीरांच्या गोष्टी बोलतांहां! मराठेशाहीचा मुडदा पाडणाऱ्या दुसऱ्या बाजीरावाच्या भाषेंत वीरांच्या गोष्टी बोलतांहां!—लढाईचं मैदान म्हणजे मेजवानीची पंगत का रे? पांचशें माणसं आहेत तिथं शिक्षण घेत पण तिथं अर्धा डझन सुद्धां मराठे नाहींत! कां?

**चंदा:**—वरणभात मिळत नाहीं म्हणून!

---

*ही अतिशयोक्ती नाहीं. ही गोष्ट प्रत्यक्ष घडल्याचें एका जबाबदार व्यक्तीकडून कळलें आहे.

**ब्रह्मानंदः**—पहिल्यापासूनच हें चुकलंय. सक्तीची लष्कर भरती झाली पाहिजे होती. एकजात सज्ञान माणसाला खेंचलं असतं फौजेंत हातांत हत्यार देऊन कीं मग कुणीसुद्धां वरणभाताची तक्रार केली नसती. 'येतां कां? येतां कां?' म्हणून विचारतात, सक्ति करीत नाहींत, मग आले नाहींत कुणी तर त्यांना दोष कशाला द्यायचा?

**चंदाः**—एवढं मात्र अगदीं बरोबर बोललांत. न बोलणाऱ्या माणसानं तोंड उघडलं कीं तो चट्कन खरं बोलून जातो तें हें असं.

**पुष्पाः**—मग मी बोलूं का आतां?

**चंदाः**—कांहीं नको बोलूं. सिनेमांतलं बोलशील कांहींतरी नि मग हे थट्टा करूं लागतील. ती आई पहा माझी, कशी मुकाट्यानं बसलीय एका बाजूला.

[ वरील भाषण चाललेलें असतांना कृपा अस्वस्थपणें या खुर्चीवरून त्या खुर्चीवर जाऊन बोलणारांच्या नजरेआड राहायचा प्रयत्न करीत असते—मधून मधून दरवाजाकडे जाऊन डोकावून पहात असते. चंदेचा वरील उद्गार ऐकतांच ती एकदम दचकून चंदेसमोर येते. ]

**कृपाः**—काय म्हणालीस?

**चंदाः**—नाहीं म्हटलं तूं कशी अगदीं स्वस्थ बसून राह्यलीयस!

**कृपाः**—वायफळ बडबड मला आवडत नाहीं. त्यांतून रोजरोज तेंच तेंच भाषण ऐकायचा तर मला अगदीं तिटकारा येतो. जायचं असलं तर सरळ लढाईवर जा म्हणावं—नुसती चर्चा करीत बसण्यांत काय अर्थ?

**दिवाकरः**—वाः कृपाताई—नव्हे, लेडी सोमनाथ! पूर्वी किती चर्चा करीत होतां तुम्हीं! कॉलेजांत असतांना तर तुम्हीं एक मूर्तिमंत चर्चामंडळ होतां. म्हणूनच ना आम्हीं त्यावेळीं तुमच्या आवतीभोवतीं गोळा होत होतों? तुमच्या लग्नाच्या वेळीं चर्चा झाली त्यावेळीं कसं आम्हांला झाडून काढलं तुम्हीं!—माफ करा हं सर साहेब, या जुन्या गोष्टी काढायला नको होत्या—पण अगदीं अलीकडे अलीकडे यांच्या स्वभावांत जो हा फरक झालाय तो पाहून आम्ही लोक अगदीं सर्द होऊन गेलों आहों.

**चंदाः**—तुम्हांला सर्द करण्यासाठींच तिनं हल्लीं बडबड बंद केलीय. समजलं?

**पुष्पाः**—अगदीं बोलल्याशिवाय माणसाला कसं बसवतं कोण जाणे! न बोलणारीं माणसं मला मुळींच आवडत नाहींत.

दिनकर:—तुमच्या आवडीनिवडीची इथं कोण वाटाघाट करतोय पुष्पाताई ?
—आमची तक्रार आहे ती यांच्याबद्दल. लढाईसारखा एवढा हा महत्त्वाचा
विषय अन् या तर अगदीं खंडोबा होऊन गेल्यायत.

सर सोम०:—खरंच, कुठं गेलाय तो खंडेराव ? केव्हांपासून शोधतोंय
त्याला पण बेट्यानं आज सारा दिवस मला तोंड दाखवलं नाहीं.

चंद्रा:—इथंच होते कीं ते आतां.

सर सोम०:—इथंच ? काय करीत होता ? आजच्या दिवसांत तर मी कांहीं
सुद्धां काम सांगितलं नव्हतं त्याला.

पुष्पा:—मी पाहूं का त्यांना ? आणूं का शोधून ?

सर सोम०:—पहा पहा बरं. आज तसं कांहीं काम नाहीं म्हणा–(आठवून)
—खरंच मी मघाशीं पांचसहा पत्रं सांगितलीं होतीं नव्हे का त्याला ?
कसा विसरलों अगदीं ! ( पुष्पा जाते ) अजून टाईप केलीं नाहींत त्यानं ?
काय म्हणावं या माणसाला ! माझ्याकडे म्हणूनच आजवर टिकलाय. कुणा
साहेबाकडे असता तर केव्हांच अर्धचंद्र मिळाला असता. ( खंडेराव येऊन
आपल्या टेबलाजवळ बसून टाईप करूं लागतो. त्याच्या मागोमाग पुष्पा येते )

पुष्पा:—हे पहा आले. खालीं व्हरांड्यावर उभे राहून सारखे वाट पहात
होते कुणाची तरी !

सर सोम०:—झालीं पत्रं ?

खंडेराव:—( बसल्या जागेवरून ) जी—नाहीं. आत्तां पुरीं करतों.

सर सोम०:—कुठं गेला होतास ?

खंडेराव:—( उभा राहून हात चोळीत ) कॅप्टपनसाहेब भेटले, ते बोलूं
लागले लढाईच्या गोष्टी—( चांचरत )—हीं एवढीं पत्रं झालीं कीं मी
राजीनामा देणार आहें.

सर सोम०:—राजीनामा ? राजीनामा देऊन कुठं जाणार आहेस ?

खंडेराव:—जी !—फौजेंत ! लढाईवर—कारकुन म्हणून नव्हे !—
शिपाई—प्रायव्हेट.

[ कृपा आणि चंदाखेरीज सर्व हंसतात ]

चंद्रा:—शाबास ! नाहींतर हे वाचाळ—

दिवाकर:—कोण ? आम्हीं वाचाळ ? आम्हीं देखिल जाऊं कीं लढाईवर.

आम्हीं जाऊं पण प्रायव्हेट म्हणून नव्हे. किंग्स् कमिशन मिळालं तरच जाऊं. काय दिनकर ! काय रे ब्रह्मानंद ?

**सर सोम०:**—( खंडेरावाला ) तूं लढाईवर जाणार आहेस ?

**खंडेराव:**—जी.

**सर सो०:**—अन् इथं माझीं कामं कोण करणार ?

**खंडेराव:**—जी—पण मी कबुल केलंय कॅप्टनसाहेबांना.

**सर सोम०:**—( मोठयानें हंसत ) लढाईवर जाणाऱ्याचं तोंड तर पहा. कधीं बंदुक घेतली होतीस हातांत ?

**खंडेराव:**—जी—नाहीं. पण आतां घेईन की—होतां होतां होऊन जाईल.

**सर सोम०:**—उगीच मूर्खपणा करूं नकोस. वरणभात नाहीं मिळत म्हणून परत यायचास एकादा !

**खंडेराव:**—आतां तुम्हींच पहा चंदाताई, हे कुणी जात नाहींत त्यांना 'जा जा' म्हणतात अन् मी जायला निघालों तेव्हां माझा असा पाणउतारा करतात ! आतां कुणीतरी पुरीं करा हीं पत्रं. झालं एवढं पुरे झालं. प्रत्येकजण थट्टा करतो माझी. आतां लढाईवर जाऊन एक नांव तरी मिळवून येईन, नाहींतर—नाहींतर—

**चंदा:**—मरून तरी जाईन. बोला ना कीं तें मर्दासारखं.

**खंडेराव:**—( उसनें अवसान आणून ) हो, मरून तरी जाईन. नमस्कार मंडळी. ( जातो )

[ कृपा, चंदा आणि सर सोमनाथखेरीज सारे हंसतात ]

**सर सोम०:**—खरोखरच गेला कीं ! पहा पहा चंदा. ( चंदा दारापर्यंत जाऊन येते ) मला वाटतं तो जाणार फौजेंत. फारच मनाला लागलेलं दिसतंय बेट्याच्या ! असं आहे हें, केव्हां कुणाची कळी कशी खुलेल हें कांहीं सांगतां यायचं नाहीं. ( दिवाकरला ) पाहिलंत ना, हा भृंगकीटक न्याय आहे. रोज रोज ठोकीत गेलं कीं केव्हांतरी असा परिणाम व्हायचाच.

**दिनकर:**—मला नाहीं खरं वाटत. कांहींतरी ढोंग करतोय बेटा. कुठंतरी दुसरीकडे मिळाली असेल नोकरी.

**दिवाकर:**—चला चला, पाहूं तर खरं. खरोखरच गेला तर उद्यांच्या अंकांत अशी एक कॉलमभर तारीफ करतों सरसाहेबांची—चला.

[ 'नमस्कार सरसाहेब' म्हणून दिवाकर, दिनकर, ब्रह्मानंद जातात— ]
**चंदाः**—उल्लूके भाई मशालजी कुठले ! कांहींतरी कारण हवं असतं यांना. बरं झालं गेले ते. ती वायफळ चर्चा तरी थांबली. ( पुष्पेला ) अन् तूं नाहीं गेलीस ?
**पुष्पाः**—कशाला ?
**चंदाः**—चौकशी करायला. तुला आवड आहे ना असल्या या चांभार-चौकशांची. जा कीं त्यांच्यामागनं.
**पुष्पाः**—मी इथं अश्शी बसून राहीन. माझी खात्री आहे, मला घेतल्या-शिवाय कॅप्टनसाहेब सिनेमाला जायचे नाहींत. अन् तूं का ग उभी कृपा-ताई ? तूंही जाणार आहेस ना ?
**कृपाः**—हो.
**सर सोम०ः**—कुणीकडे ?
**कृपाः**—त्याचाच विचार करतेंय, सिनेमाला जावं कीं फिरायला जावं !—कीं जावं असंच कुठंतरी रेड क्रॉसमधें ! सारेच चाललेयत लढाईवर—
**सर सोम०ः**—पण मी आहें ना इथं ? माझी काळजी कोण घेणार ? जखमी शिपायासारखा मी इथं पडलोंय, इथं माझ्यासाठीं कुणीतरी हवीच कीं नाहीं रेड क्रॉस नर्स ?
**कृपाः**—ही चंदा आहे ना ?—नि पुष्पाही कांहीं जायची नाहीं इथनं.
**चंदा**—छान ! लढाईवर जाईन म्हणून तळमळत होतें मी, अन् लढाईवर जायला निघालीस तूं ! खंडेराव म्हणाले तें कांहीं खोटं नाहीं, अगदीं करनकरी स्वभाव आहे आमच्या बाबांचा. जाणाराला नको म्हणतात नि राहणारांच्या मागें लागतात ' जा जा ' म्हणून !
**सर सोम०ः**—वाटेल त्यानं मला आतां वाटेल तें बोलावं ! पेन्शनर आहें ना मी—आज लढाईवर गेलों असतों, तिथं कांहीं मर्दुमकी गाजविली असती, लौकिक मिळवला असता म्हणजे कुणाची छाती झाली असती मला उलटून बोलायची ?
**चंदाः**—कसला लौकिक मिळणार ? जनरल झालां असतां का तुम्ही ? लहान शिपाई, मोठे शिपाई, त्याहून आणखी मोठे शिपाई, फार फार तर कर्नल एवढीच ना धाव ?

**सर सोम०**:—तें काय थोडं झालं? तेवढी तरी कुठं कुणी मजल गांठली आहे आज? काय करूं—नुसता तळमळत पडलोंय—( उठून एकदोन येरझाऱ्या घालून ) गेला का तो?

**चंदा**:—कोण तो?

**सर सोम०**:—खंडेराव. माझी खात्री आहे, उंबरठ्याबाहेर पाऊल टाकायची कांहीं त्याची छाती व्हायची नाहीं. 'जातों जातों' म्हणेल नि घाबरून येईल परत. ( चंदा हंसते ) हंसूं नकोस चंदे. कुणाचा मगदूर किती आहे याची चांगली कल्पना आहे मला. ( पुनः चंदा हंसते ) हंसूं नको म्हणतों ना? चीड येते मला तुझ्या या हंसण्याची.—जसा कांहीं मी म्हणजे कुणीच नव्हे! जशी कांहीं माझ्या शब्दाला कांहीं किंमतच नाहीं.—( कृपा जाऊं लागते ) कुठं चाललीस?

**चंदा**:—रेड् क्रॉस नर्स व्हायला.

**कृपा**:—कॅप्टनसाहेबांना कबूल केलंय मी—न गेलें तर त्यांना काय वाटेल? ( एक क्षण थांबून ) नको जाऊं? नको म्हटलं तर नाहीं जाणार.

**पुष्पा**:—तूं जात नसलीस तर मी जातें.

**सर सोम०**:—नाहीं नाहीं—( कृपेला ) जा तूं. आतां लढाईवर जाणार आहे तो—केव्हां येईल कोण जाणे—जा जा बरं. ( कृपा जाते. चंदेला ) तूं नाहीं गेलीस?

**चंदा**:—मला बोलावलंच नाहीं कुणी. कवयित्री नाहीं ना मी?

**पुष्पा**:—आधीं मला बोलावलं होतं त्यांनीं—पण कृपाताईचा अग्रमान आहे ना? मला कित्ती कित्ती बोलायचं होतं कॅप्टन साहेबांशीं. आतां सिनेमाहून आल्यावर तरी मला नेतात कीं नाहीं तें पहायचं! ( जाते )

**सर सोम०**:—काय झालंय मला आज? कुठं बिघडलंय? कसा विसरभोळा झालों मी? साखरपुडा व्हायचा आहे ना आज? पुष्पा—पुष्पा—( पुष्पा येते ) पहा बरं, गेली कीं काय ती?

**पुष्पा**:—गेली—खरोखर गेली—बरोबर एक सूट केस घेऊन गेली—

**सरसोम०**:—सूट केस घेऊन गेली!—सूट केस कशाला? सिनेमाला जायला सूट केस कशाला? काय झालंय आज? सारींच माणसं आज कां असा विक्षिप्तपणा करताहेत? तूं कां ग उगीच बसलीयस चंदे?

चंद्राः—साखरपुडा व्हायचा आहे ना माझा आज? त्याचा विचार करतेय. साखरपुडा काय नि लग्न काय, एकच! हें असं धावतं लग्न होणार आहे माझं—नि मग माझे हे भावी पतिराज लढाईवर जाणार आहेत! केवढं माझं भाग्य हें! कुठल्या मुलीला असलं भाग्य या आमच्या देशांत क्वचितच लाभलं असेल—म्हणजे पांढरपेशा मुलीला हो! खूप शिपाई जाताहेत लढाईवर—ते सारे आहेत मराठे-कुणबी. नवरा गिरणींत गेला काय किं लढाईवर गेला काय, मराठे-कुणब्यांच्या बायकांना त्याची कांहीं फिकिर वाटत नाहीं. संवयच आहे ना त्यांना ती. आम्हां ब्राह्मणांच्या पोरींना ही आतां नवी नवलाई होणार आहे.

पुष्पाः—भाग्यवान् आहेस तूं चंदे.

चंद्राः—कसलं भाग्य? लग्न तरी झालं असतं म्हणजे पेन्शन तरी मिळालं असतं. नवरा नाहीं आणि पेन्शनही नाहीं असं झालं नाहीं कीं मिळविली!

सुर सोम०—आतां गप्प राहशील चंदे? लग्नच हवं असेल तुला तर लग्नच करून टाकतों—मग तरी होईल तुझं समाधान?

चंद्राः—कसं होईल समाधान? नुसतं लग्न लागायचं नि लगेच नवरा जायचा लढाईवर—

पुष्पाः—तें काय थोडं झालं? तेवढं झालं असतं तरी सुद्धां मला समाधान वाटलं असतं.

सर सोम०:—आतां गप्प बसा पाहूं तुम्ही दोघीजणी. सर्वांनींच मला सतावायचा बेत केलाय असं वाटूं लागलंय मला. जा निघून म्हणावं सारीजणं. कुणी राहूं नका इथं. काय माझं व्हायचं असेल तें होईल.

चंद्राः—सारींजणं कशीं? आई आहे ना इथं? अन् मी तरी कुठं जातें आहें? लढाईवर जाणारा नवरा कांहीं आपली बायको बरोबर घेऊन जात नाहीं लढाईच्या मैदानावर. बायको म्हणजे कांहीं बंदूक नव्हे—उचलली कीं टाकली खांद्यावर आणि चालला लढाईवर. अन् या पुष्पाचं तरी कुठं लग्न ठरलंय कुणाशीं? कुण्णी जात नाहीं इथून—कांहीं काळजी करूं नका. तो खंडेरावसुद्धां जायचा नाहीं कुठं—( पुष्पेला ) हें पहा, आतां तूं या खंडेरावाला पकड तो परत आल्याबरोबर. होऊन जाऊं देत एकदां सर्वांचीं लग्नं.

पुष्पाः—थट्टा करूं नकोस हं चंदे. मला थट्टा खपत नाहीं अगदीं. त्यांतून

अशा या दुःखावर डागण्या दिलेल्या तर मुळींच खपत नाहींत. मी जातेंच कशी इथून. ( जाते )

**सर सोम०:**—गेली ? बरं झालं. आतां मोकळ्या मनानं बोलतां येईल मला. आतां सांग चंद्रे, खरोखरच या लग्नाला तुझी कबुली आहे का ?

**चंद्राः**—तुम्हीं ठरवलंय ना तें ?

**सर सोम०:**—ठरवलंय—पण असं वाटतंय आतां धरून बांधून कुणाला संसारांत पाडणं कांहीं बरं नव्हे. हेंच पहा, ही आतां सूट केस घेऊन निघून गेली—कां सूट केस घेऊन गेली ?—( क्षणभर स्तब्धता ) विचार करूं लागलों कीं असं वाटतं मला, कीं ती कांहीं तितकीशी सुखी नाहीं इथं. आजपर्यंत एका शब्दानंसुद्धां तिनं कधीं मला दुखवलं नाहीं—तिला दुःख होईल असं मी सुद्धां कधीं कांहीं केलं नाहीं. पण पुनः पुनः वाटतं—( थांबून ) पुनः पुनः वाटतं म्हणून काय उपयोग ? जें झालं तें कांहीं आतां बदलतां येत नाहीं. तुला काय वाटतं ?

**चंद्राः**—असला प्रश्न बापानं मुलीला विचारूं नये.

**सर सोम०:**—मग कुणाला विचारावा ? दुसरं कोण आहे माझ्या जिव्हाळयांचं ?

**चंद्राः**—तेव्हां विचारलं होतं का मला ? मी कांहीं लहान नव्हतें तेव्हां.

**सर सोम०:**—खरंच. तेव्हां विचारलं पाहिजे होतं—पण मी विचारलं नाहीं. मी माझ्याच रंगांत रंगून गेलों होतों. एक नवीन कल्पना सुचली, त्या कल्पनेनं माझी पकड घेतली—ती एक लढाऊ कल्पना आहे असं मला वाटलं—लढाईवर ज्या दिवशीं मला पहिली गोळी लागली त्या दिवशीं जिचा जन्म झाला असेल तिच्याशीं लग्न करायचं ! पण हें ध्यानांत आलं नाहीं त्यावेळीं माझ्या, कीं ज्यावेळीं ही गोळी मला लागली त्यावेळीं मी तरणाबांड होतों—त्यावेळीं एक मुलगीही होती मला—तेंच मी विसरलों होतों—

**चंद्राः**—हो. जें विसरूं नये तेंच विसरलां होतां.

**सर सोम०:**—आतां वाटतं, तीच माझी चूक झाली. असं कुणी सांपडेल असं त्यावेळीं मला वाटलं नव्हतं—आणि म्हणूनच मी त्या कल्पनेंत रंगून गेलों होतों. लढाईच्या धूमश्चक्रींत जितका रंगून जात होतों तितकाच—अगदीं त्याच भावनेनं रंगून गेलों होतों. अशक्य वाटणारी ती कल्पना

खरी ठरली—त्याच दिवशीं जन्माला आलेली ही आपणहून चालत माझ्याकडे आली—

**चंदा:**—आणि मागला पुढला कांहींसुद्धां विचार न करतां तुम्हीं तिच्याशीं लग्न केलं ! मला सुद्धां विसरलां त्यावेळीं. आक्काची तर आठवणच नव्हती तुम्हांला—

**सर सोम०:**—( मधेंच विचुकपणें ) सूट केस घेऊन का गेली ती ?

**चंदा:**—मला काय माहीत ? रेडक्रॉसकडे तर गेली नाहीं ?

**सर सोम०:**—हो. तसंही असेल. पण तसं असतं तर तिनं मला आधींच सांगितलं असतं.

**चंदा:**—तसंच कांहीं म्हणाली नाहीं का ती आतांच ? त्यावेळीं तुम्हीं काय म्हणाला तें आठवतं ना तुम्हांला ?

**सर सोम०:**—हो. जाईन म्हटलं असतं तिनं, तर मी तिला जाऊं दिलं नसतं. तिनं अगदीं बरोबर अंदाज केला. शंकाच नाहीं—रेड क्रॉसमधेंच गेली ती. ( कॅप्टन गोखले येतो ) आं ? तुम्हीं ?

**कॅप्टन:**—माफ करा सरसाहेब—आपली ईच्छा मला पुरी करतां येत नाहीं. या क्षणालाच मला इथून निघून गेलं पाहिजे. आत्तांच घरीं गेलों तिथं हुकूम मिळाला—

**सर सोम०:**—ती कुठं आहे ?

**कॅप्टन:**—कोण ती ?

**सर सोम०:**—लेडी सोमनाथ.

**कॅप्टन:**—लेडी सोमनाथ ? ती कुठं आहे तें मला काय माहित ?

**सर सोम०:**—तुम्हीं बोलावलं होतं ना तिला ?

**कॅप्टन:**—पण त्या नाहीं म्हणाल्या.

**चंदा:**—नाहीं. नाहीं कुठं म्हटलं तिनं ? तुमच्याबरोबर सिनेमाला जाणार आहे असंच नाहीं का म्हणाली ती ?

**कॅप्टन:**—तसं त्या तुमच्यासमोर म्हणाल्या. तुम्हीं नव्हतां त्यावेळीं त्या काय म्हणाल्या तें तुम्हीं ऐकलं नाहीं. सर सोमनाथ, क्षमा करा—

**सर सोम०:**—मग ही गेली कुठं ? खरोखरीच का ती तुमच्याकडे गेली नाहीं ?

**कॅप्टन**:—मी का खोटं सांगेन ? इथून गेलों तो मी सरळ घरीं गेलों. एक तासाच्या आंत स्टेशनवर हजर रहायचा मला हुकुम मिळाला. आपल्याला मी वचन दिलं होतं, मला मोठं दुःख वाटतं कीं तें वचन पुरं करणं आतां मला अशक्य झालंय. जगूनवांचून परत आलों—( सर सोमनाथचा हात धरून शेकहँड करतो, एक पाऊल मागें हटून मिलिटरी सॅल्यूट करतो ) येतों मी. ( जातो )

**चंदा**:—माझ्याकडे पाहिलंसुद्धां नाहीं. कोण जाणे खराच हुकुम आला आहे कीं नाहीं !

**सर सोम०**:—असं म्हणूं नकोस चंदा. तो फौजी माणूस आहे. तो खोटं बोलायचा नाहीं.

**चंदा**:—हंः !

**सर सोम०**:—नाहीं – तो खोटं बोलणार नाहीं. माझी अगदीं खात्री आहे. कारकुनांची जात रोज नजरेसमोर दिसत असते, त्यामुळं तूं फौजी माणसाचा सुद्धां संशय घेऊं लागलीयस —(रामनाथ येतो) हे कारकुन म्हणजे—आतां तूं आलास ! याचवेळीं कुठं तुला यायची बुद्धि झाली ? कुणाला पाहिजेय चिट्ठी ?

**रामनाथ**:—नाहीं—तसं नाहीं—मी चिट्ठी मागायला आलों आहें असंच कांहीं नाहीं—पण मला जी चिट्ठी पाहिजेय—

**सर सोम०**:—चिट्ठी पाहिजेय ! चिट्ठी पाहिजेय ! ! आतां शरणचिट्ठी लिहून देतों तुला ! यापुढं साऱ्या चिठ्या बंद. कुणालासुद्धां चिट्ठी द्यायची नाहीं—

**रामनाथ**:—लढाईवर जाणारालासुद्धां ?

**सर सोम०**:—असं कुठं म्हटलं मी ? केव्हां जाणार आहेस लढाईवर ?

**रामनाथ**:—लढाईवर म्हणजे—म्हणजे फौजेंत जायचं नाहीं आहे मला —हं, हं, ऐकून घ्या—मी आरमारांत जाणार आहें म्हणतोंय—म्हणजे लढाईवरच—पण जमिनीवर नव्हे—अस्मानांत नव्हे—पाण्यांत—समुद्रावर—तुफान लाटांच्या पर्वतावरून उड्डाण करीत जाणाऱ्या समुद्रयानांतून जमिन अस्मान आणि पाण्यांत संचार करणाऱ्या शत्रूच्या फौजी, अस्मानी आणि नाविक दलावर एकजात मारा करणाऱ्या आरमारांत जाऊन लढायचं आहे मला—

**चंदा**:—हुश्श ! कुठलं भाषण पाठ केलंत हें ?

**सर सोम०:**—उगी रहा चंदा, कसा का होईना, पण लढाईवर जाणाऱ्या माणसाचा पाणउतारा करणं मला नाहीं आवडत. अस्सं! एकूण तुला सद्‌बुद्धि झालीच! पण असं पहा, या आरमाराची मला कांहीं माहिती नाहीं. लढाई सुरू व्हायच्यापूर्वीं त्या आमच्या वालचंदनं बोटी बांधायची कांहीं गडबड चालवली होती, पण तें तेवढंच राहिलं वाटतं—

**चंदा:**—बोटीच कां, मोटरीचासुद्धां कारखाना निघणार होता त्यांचा—अन् विमानाचासुद्धां—हंः! जमिन, अस्मान नि पाणी सारं एका मुठींत खेळवा-यचा बेत केला होता त्यांनीं—

**सर सोम०:**—अग पण त्या व्यापारी बोटी—फिरायच्या मोटरी—

**चंदा:**—नि विमानं कसलीं? काय व्यापारी बोटी तयार करायच्या कार-खान्यांत आरमारं निघायचीं नाहींत! फिरायच्या मोटरीच्या कारखान्यांत काय टँक्स बांधतां यायचीं नाहींत! नि विमानं! तीं काय लुटुपुटूचीं विमानं होणार नव्हतीं! बोटी मोटारी न् विमानासाठीं सातासमुद्रांपलीकडे दृष्टि लावून बसलों आहोंत आज! हंः!

**सर सोम०:**—खरंय तें—खरंय! वेडी असतों आम्हीं म्हातारीं माणसं. गगनाला गवसणी घालावी असं वाटत असतं आम्हांला—तशीच गगनाला गवसणी घालायला निघाला होता हा वालचंद—मला सुद्धां वाटतं जनरल व्हावं म्हणून—

**चंदा:**—पण इथं जखमी होऊन पडलांहांत—लढाईच्या गोळीनं नव्हे,—

**रामनाथ:**—हं हं बोलूं नको—तें बोलायचे दिवस हे नव्हेत.—तेव्हां मी असं म्हणत होतों सरसाहेब, मला आरमारांत जायचं आहे. कोंकणचा माणूस मी, सारा जन्म गेलाय बोटींतून प्रवास करतांना, तेव्हां मला वाटलं आपली बोटींतलीच नोकरी बरी—( क्षणभर स्तब्धता ) मग चिठ्ठी देतां ना मला?

**सर सोम०:**—( भानावर येऊन दचकून ) काय म्हटलंस? कुठं भटकलों होतों मी? आज काय झालंय असं मला! असं पहा रामनाथ, यावेळीं जा तूं. मला चौकशी केली पाहिजे. तशी चांगलीशी माहिती आधीं मिळवली पाहिजे. मग ये—थोड्या वेळानं ये—

**रामनाथ:**—( चंदेला ) लेडी सोमनाथ आहेत ना आंत?

**चंदा:**—अस्सं!

**रामनाथः**—उगीच गैरसमज करून घेऊं नकोस चंदा. त्यांनींच सांगितलं मला आरमारांत जायला नि म्हणूनच जातोंय मी आरमारावर—

**सर सोमः**—आतां जा पाहूं इथनं. मला त्रास देऊं नकोस.

**रामनाथः**—मग तिकडेच बसतों तर.

**सर सोम०ः**—तिकडेच बैस, घरीं जा, दुसऱ्या कुठं जा, पण यावेळीं इथून जा.

[ संशयास्पद मुद्रेनें सर सोमनाथ आणि चंदा यांच्याकडे पुनः पुनः मागें वळून पहात रामनाथ जातो ]

**सर सोम०ः**—गेला ना तो ! पाहा पाहूं. ( चंदा दारापर्यंत पाहून परत येते ) याचवेळीं यायची बुद्धि कां झाली याला ? कुठं गेली आहे ही ? भलत्याच कल्पना कां येताहेत माझ्या मनांत ? सूट केस घेऊन गेली, कॅप्टन बरोबर जातों म्हणाली, पण तोच निघालाय कुठं तरी जायला. उद्यां जाणार होता तो आजच जायला निघालोंय म्हणाला. खरोखरच का त्याला हुकूम आला असेल ? खरोखरच का त्याला आत्तांच स्टेशनवर जायचं असेल ? मग सूट केस घेऊन ही कुठं गेली ?

**चंदाः**—आतां स्वस्थ बसा पाहूं इथं. उगीच डोक्याला शीण देऊं नका. गेली असेल कुठं तरीं. नवं कापड खरेदी करायचं असलं म्हणजे अशी सूट केस घेऊन जात असते ती ! तशीच गेली असेल कुठं तरी मार्केटांत !

**सर सोम०ः**—असेल—असेल. उगीच कांहीं तरी आलं माझ्या मनांत. असं झालंय हें अलीकडे. ब्रह्मदेशांतून हा कॅप्टन आल्यापासून माझं मन कसं बावचळून गेलंय. लढाईवर जायचं वेड सारखं उसळून उठलंय, त्यामुळं हें असं होतं. कां सरकार मला पाठवित नाहीं लढाईवर ?

**चंदाः**—पाठवतील—आज उद्यां केव्हांतरी तुम्हांला देखील लढाईवर पाठवावं लागेल—माझी अगदीं खात्री आहे.

[ बोलत असतांना चंदा एकदम दचकते. दारांत खंडेराव आणि कृपा उभीं असल्याचें तिला दिसतें. ती एकदम वळून मागें पाहूं लागते ]

**सर सोम०ः**—काय झालं ?—कोण आलंय ?—( वळून पाहून ) तूं ? कुठं गेली होतीस ? अन् ही सूट केस ! कशाला नेली होतीस ही सूट केस ?—हंः ! शेवटी तूंही आलास परत ?

**खंडेराव**:—( पुढें येऊन गंभीरपणें ) नाहीं—मी जाणार आहे पुनः !—

( स्तब्धता )

**सर सोम०**:—असा कां पाहातोयस माझ्याकडे ?

**खंडेराव**:—आम्हीं पळून जात होतों—

**सर सोम०**:—कोण ?

**खंडेराव**:—आम्हीं दोघं—ही नि मी !—

**सर सोम०**:—ही ? लेडी सोमनाथ तुझ्याबरोबर पळून जात होती ? तुझ्याबरोबर ?

**कृपा**:—हो—यांच्याबरोबर मी पळून जात होतें. ( स्तब्धता )

**सर सोम०**:—चंदा, तें पिस्तुल घे इकडे.

**कृपा**:—( स्वत: पिस्तुल आणून त्याच्या हातीं देत ) चंदा कशाला ? मीच देतें. हे घ्या पिस्तुल. आतां घाला गोळी मला—( स्तब्धता ) थांबलांत कां ? झाडा ना तें पिस्तुल माझ्यावर ! पहातां काय?—

**सर सोम०**:—कुणाचा हा अपराध ?

**कृपा**:—माझा !—

**खंडेराव**:—नाहीं—माझा—मी चिथावलं तिला—ती भीत होती —

**सर सोम०**:—ही भीत होती ? नि तूं धीर केलास ? भेकडा, कुणाला सांगतोस हें ? मी काय तुला ओळखत नाहीं ?

**कृपा**:—नाहीं ! कुणालाच ओळखलं नाहीं तुम्हीं ! कोण भेकड असेल तर ती मीच. भेकडासारखं मी तुमच्याशीं लग्न केलं. तें मोठं धाडस होतं माझं, असं त्यावेळीं मला वाटलं होतं, पण तें धाडस नव्हतं—अविचारही नव्हता—नुसता भेकडपणा होता तो ! आणि तुम्हीं तरी काय केलं ? कांहीं विचार केला तेव्हां ? वेड्यासारखी मी आलें—वेड्यासारखा होकार दिला नि तुम्हीं बिनतक्रार लग्न केलं माझ्याशीं. ही चंदा होती, पण हिला विचारलं होतं तुम्हीं ? हिच्याहूनही एक मोठी मुलगी होती, तिची आठवण झाली होती का तुम्हाला त्यावेळीं ? कां ?—सांगा ना—कां माझ्याशीं लग्न केलंत ? ‘मूर्ख आहेस—जा निघून’ असं कां म्हटलं नाहीं त्यावेळीं ? बोला ना—द्या ना या प्रश्नाचं उत्तर. भेकड म्हणे ! कोण भेकड ?

**खंडेराव**:—भेकड मी—खरोखर तो माझाच भेकडपणा होता. ती जाहिरात

पाहून मूर्खासारखी धांवत गेलीस—त्याचवेळीं मी तुला मागं खेचून आणलं पाहिजे होतं—

**सर सोम०**—तूं ? तुझा काय संबंध ?

**खंडेरावः**—माझा काय संबंध ! सरसाहेब, ही माझी वाग्दत्त वधू होती. ज्या मुहूर्तावर आमचं लग्न होणार होतं—

**सर सोम०ः**—( कृपेला ) होय ? ( ती मानेनें होकार देते ) कां मला सांगितलं नाहींस तसं ? परस्त्रीशीं मी केव्हांच लग्न केलं नसतं.

**खंडेरावः**—म्हणूनच तिनं सांगितलं नाहीं. हीच ती कविमनाची मृदुलता ! हंः ! कविमन म्हणे ! बापाशीं लग्न करणारं हें कविमन किती भेकड होतं तें कळलं ना आतां ? मी कवि नव्हतों—मर्दासारखा मर्द होतों—माझ्या बेछूट-पणाची सारेजण तारीफ करीत होते तो मीही भेकड ठरलों ! सरळ तुमच्या-कडे येऊन तसं सांगायचा मला धीर झाला नाहीं. हिचं लग्न झालं नि मी खचलों—हा असा झालों होतों—नाहीं, हा असा झालों तो झालोंच. आज हिला घेऊन पळून जायच्या पूर्वींही तसं सांगायचं धैर्य मला झालं नाहीं. सारींच भेकड झालों होतों आम्हीं—

**सर सोम०ः**—लढाईवर जायचं ढोंग करण्यापुरता धीर केलास ?

**खंडेरावः**—नाहीं. तें ढोंग नव्हतं—खरोखरच मी लढाईवर जायला निघालों होतों. पण ही आली—( स्तब्धता ) क्षणभर माझं मन चळलं. कां चळूं नये ! हिचं लग्न झालं तेव्हां मला धक्का बसला. केवढं प्रेम होतं आमचं ! ही विसरली—मी विसरलों नाहीं—

**कृपाः**—नाहीं—मी विसरलें नव्हतें.

**खंडेरावः**—मग कां हा व्यभिचार करीत होतीस ? सरसाहेब, मला क्षमा करा, पण मी तुम्हांला सांगितलं पाहिजे होतं—हिच्यापासून दूर राहणं मला अशक्य झालं म्हणून मी इथं ही नोकरी पत्करली. प्रतिक्षणाला अनंत यातना होत होत्या मला—त्यामुळंच मी दुबळा झालों—भेकडाहून भेकड झालों. [illegible] दुबळ्याचं राज्य नि म्हाताऱ्याची बायको वाटेल त्यानं छिनावून न्यावी [illegible]—मनांत येई पण मी तसं केलं नाहीं. दुबळ्या [illegible] जा आलों उधळून लावते—पदच्युत करते—

तसंच हें झालं. तुम्हांला पदच्युत करून ही माझ्याकडे आली—आपल्या पावलीं आली. हिला घेऊन मुकाट्यानं जावं असं क्षणभर मला वाटलं—निघालों—पण थांबलों—( थांबतो )

**सरसोम०:**—कां थांबलास ?

**खंडेराव:**—कारकुनीमुळं भेकडपणा अंगीं पुरेपुर बाणला होता म्हणून थांबलों. नीतीचं म्हणा कीं अनीतीचं म्हणा, धैर्य माझ्या अंगीं नव्हतं म्हणून हिला घेऊन परत इथं आलों—

**सर सोम०:**—जा—हिला घेऊन जा. ही पत्नी आहे तुझी ! माझ्याशीं झालं तें लग्न नव्हे, तो व्यभिचार होता हिचा. वैदिक विवाह आहे म्हणून माझा नाइलाज आहे, नाहींतर डिव्होर्स देऊन ही तुझी पत्नी मी तुझ्या हवालीं केली असती.

**खंडेराव:**—जगाला तें पटलं नसतं—मलाही पटलं नसतं. सरसाहेब, हा पावित्र्याचा काळ आहे. परचक्रासारखा मी तुमच्या घरांत घुसून हा भेद केला त्याची मला क्षमा करा. या तुमच्या मुलीनं मला दिव्यदृष्टी दिली—

**सर सोम०:**—कुणीं ? चंदेनं ? काय केलं हिनं ?

**खंडेराव:**—मला लढाईवर जायची स्फूर्ती दिली. त्या पवित्र व्रताचं कंकण मी बांधलं आहे. शिपाई म्हणून मी लढाईवर जाणार आहें. किंग्स् कमिशनच्या पांढरपेशा लालचेनं नव्हे—एक मराठा म्हणून—एक कुणबी म्हणून मी लढाईवर जाणार आहें. त्या लढाईवरून मी परत येणार कीं नाहीं याची मला पर्वा नाहीं. माझ्या देशाच्या संरक्षणाखालीं हा देह धारातीर्थी पडला तर हें पूर्वीचं पाप धुवून जाईल. कुणी सांगावं ?—कदाचित माझी वृत्ती पालटेल. या महायुद्धाच्या अखेरीला या भारतवर्षाचं भवितव्य जसं बदलणार आहे तसं माझंही बदलेल—पूर्वीचे लागेबांधे तुटतील—

**चंदा:**—नि नवे संबंध जोडले जातील. खंडेराव, तोंपर्यंत ही चंदा तुमच्या पाणिग्रहणाची वाट पाहात राहील.

**सर सोम०:**—काय म्हटलंस ?

**चंदा:**—तुमचा कांहीं संबंध नाहीं त्यांत.

**कृपा:**— शाबास चंदा—शाबास !

**चंदा:**—( खंडेरावाला ) या—माझ्या सुरांत सूर मिळवा आणि म्हणा हें माझ्या कृपाताईचं रणगीत—

( सर्व गाऊं लागतात )

**चला उठा चला उठा चला उठा रणाकडे ।**
**स्वतंत्र भारतासि नाहिं आज काहिं सांकडें ॥ ध्रु. ॥**

**अथांग आमुची गती अपार आमुची मती ।**
**अनंत बाहु अस्त्र-शस्त्रयुक्त हे विराजती ।**
**अगण्य गण्य-मान्य त्या विभूतिही अम्हांकडे ॥ १ ॥**

**हिमालयाग्रधूसरा विशाल आमुची धरा ।**
**उगारि लाथ हांसडोनि दे प्रचंड सागरा ।**
**बिशाद काय कोण पाहि ढुंकुनी अम्हांकडे ॥ २ ॥**

**—वंदे मातरम्—**

*